


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्धारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल ते जून २०१९

## ११३ वा वर्धापन दिन समारंभ व पुरस्कार प्रदान सोहळा






अनुक्रमणिका






मसापचा राजा फडणीस पुरस्कृत उत्कृष्ट मसाप शाखा फिरता करंडक महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मावळ शाखेला (जिल्हा पुणे) डॉ. सुधीर रसाळ यांच्या हस्ते प्रदान




मसापचा राजन लाखे पुरस्कृत बाबुराव लाखे स्मृतिप्रीत्यर्थ वैशिष्ट्यपूर्ण शाखा पुरस्कार मसाप शाखा नाशिक रोड (नाशिक) यांना डॉ. सुधीर रसाळ यांच्या हस्ते प्रदान




मसापचा रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा मसाप कार्यकर्ता पुरस्कार रावसाहेब पवार (मसाप शाखा सासवड ता. पुरंदर जिल्हा पुणे) यांना प्रदान



मसापचा रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा मसाप कार्यकर्ता पुरस्कार नरेंद्र फिरोदिया (सावेडी उपनगर शाखा अहमदनगर) यांना प्रदान




अंक क्र. ३६६, एप्रिल - जून २०१९



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)











अनुक्रमणिका




◆

मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

◆

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
९८८१२३५०३३

◆

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

◆

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट अॅडव्हर्टायझिंग**

◆

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

◆

मुद्रितशोधन
**आरती देवगांवकर**

◆

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

◆

मूल्य : १५ रुपये

◆

प्रकाशन क्र. ३६६
एप्रिल-जून २०१९

◆



# अं त रं ग





अनुक्रमणिका



संपादकीय

डॉ. पुरुषोत्तम काळे

# गिरीश कार्नाड यांचे निधन : बहुआयामी प्रतिभावंत गेला


नपीठविजेते गिरीश कार्नाड यांचे निधन ही साहित्य, नाट्य, अभिनय, दिग्दर्शन, सिनेमा या क्षेत्रांतील जाणकारांबरोबरच सामान्य रसिकांच्या दृष्टीने अतिशय दुःखद घटना आहे. कार्नाडांचे व्यक्तिमत्त्व हे बहुआयामी होते. शिरसी (कर्नाटक) येथे बालपण गेल्यामुळे यक्षगान, दशावतार या लोकपरंपरेचे त्यांच्यावर झालेले संस्कार, कन्नड अभिजात साहित्य परंपरेचा त्यांचा व्यासंग आणि ऑक्सफर्ड येथील शिक्षणामुळे पाश्चात्य आधुनिक जीवनमूल्यांचा जवळून झालेला परिचय यांमुळे कार्नाडांचे व्यक्तिमत्त्व समृद्ध झाले.

मूलतः श्रेष्ठ कवी होण्याचं स्वप्न पाहणारे कार्नाड प्रख्यात नाटककार झाले. 'हयवदन', 'नागमंडल' यांसारखी लोककथांवर आधारित नाटके, 'ययाति', 'अग्नि आणि पाऊस' यांसारखी पुराणकथांवर आधारित नाटके, ऐतिहासिक घटनांवर आधारित, 'तलेदंड', 'तुघलक' ही नाटके त्यांनी लिहिली. ख्यातकीर्त नाट्यदिग्दर्शक-समीक्षक इब्राहिम अल्काझींच्या सान्निध्याने कार्नाडांच्या रंगभूमीबाबतच्या आकलनाला नवीन परिप्रेक्ष्य मिळाले. १९६०च्या दशकाचा तो काळ मुंबईतील नाट्यचळवळीसाठी 'रेनेसान्स'चा काळ होता. कार्नाड, विजय तेंडुलकर, सत्यदेव दुबे, अरविंद-सुलभा देशपांडे, बादल सरकार, महेश एलकुंचवार आदी प्रयोगशील रंगकर्मींमुळे भारतीय रंगभूमीला वैभवाचे दिवस येऊ लागले. कार्नाडांनी म्हटल्याप्रमाणे मुंबईची नाट्यचळवळ ही राष्ट्रीय रंगभूमीची प्रतिकृती होती. 'जुन्याचं पुनरूज्जीवन करण्याबरोबरच जुन्याकडे नवेपणानं बघण्याची दृष्टी आपल्याकडं आली पाहिजे. इतिहासाचा कच्चा माल वापरून नव्या कलाकृती जन्मल्या पाहिजेत,' या कीर्तीनाथ कुर्तकोटींच्या विचारांनी कार्नाडांना नवा परिप्रेक्ष दाखवून दिला. याचंच फलित म्हणजे ऐतिहासिक वाचनामधून त्यांना गवसलेला 'तुघलक' प्रतिभावान; पण समकालिनांच्या नजरेत 'वेडा' मानल्या गेलेल्या या सुलतानाने आपल्या राज्यकारभाराच्या काळात सुमारे पाच वर्ष सार्वजनिक प्रार्थना थांबविली होती. या गोष्टींमुळे तुघलकाकडे एका नव्या दृष्टिकोनातून पाहावयास कार्नाड उद्युक्त झाले. 'तुघलक' देशभरात गाजले. या नाटकाचे अनेक भाषांमध्ये अनुवाद झाले. 'हयवदन' हे कथासरित्सागरमधील कथेवर आधारित नाटक त्यांनी लिहिले. याच कथेवरून थॉमस मान या जर्मन लेखकाने अगोदर 'द ट्रान्सपोज्ड हेड्स' नावाची लघुकथा लिहिली होती. मूळ कथासरित्सागरमधील कथेचा आधार घेऊन लिहिलेल्या 'हयवदन'मध्ये संगीत, मुखवटे, नृत्य, मुखाभिनय यांचा





अनुक्रमणिका



वापर कार्नाडांनी केला. हे नाटकदेखील गाजले. न्यूयॉर्क येथे 'डिव्हायडेड टुगेदर' या नावाने या नाटकाचे प्रयोग झाले. साहित्य अकादमी आणि ज्ञानपीठ पुरस्कारांनी सन्मानित गिरीश कार्नाड हे अभिव्यक्तीस्वातंत्र्याच्या राजसत्तेकडून होणाऱ्या दमनाविरोधात प्रसंगी रस्त्यावर उतरत असत. आजारी असतानाही 'शहरी नक्षलवादी' म्हणून अटक केलेल्या बुद्धिवंतांच्या बाजूने ते आंदोलनात उतरले. त्यांना धमक्याही आल्या; परंतु निर्भयपणे त्यांनी आपले विचार मांडले आणि भूमिका घेतल्या. या महान कलाकाराने परंपरा आत्मसात करून आधुनिकतेचा परामर्श आपल्या नाट्यकृतीतून घेतला. कार्नाडांचे आपल्यातून निघून जाणे हे वेदनादायी आहेच; परंतु त्यांच्या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा भारतीय वैचारिकतेवर उमटलेला ठसा पुसणे काळालाही शक्य होणार नाही. अलविदा कार्नाड!

मराठी समीक्षेमध्ये आदिबंधात्मक समीक्षेचा पाया घालून तिला सुप्रतिष्ठित करण्याचे मोठे कार्य करणारे 'ज्ञानेश्वरीचा तृष्णाबंध' या ग्रंथातून तृष्णेच्या काव्यशास्त्राची मांडणी करणारे ज्येष्ठ समीक्षक म.सु.पाटील यांचे निधन हा मराठी साहित्य-समीक्षाक्षेत्रातील विचारवंतांवर दुःखद आघात आहे. मुंबई-पुण्याकडील साहित्यचर्चेचे केंद्र ६०च्या दशकात मालेगावसारख्या ग्रामीण भागात नेण्याचे कार्य पाटील सरांनी केले- 'अनुष्टुभ'सारख्या दर्जेदार नियतकालिकाची निर्मिती करून अनेक नव्या समीक्षकांना घडविले. त्यांच्या 'सर्जनप्रेरणा आणि कवित्वशोध' (२०१३) या ग्रंथाला सन २०१८चा अत्यंत प्रतिष्ठेचा पुरस्कार प्राप्त झाला.

महर्षी वि. रा. शिंदे यांच्या जीवनकार्याचे अभ्यासक आणि साक्षेपी समीक्षक डॉ. गो. मा. पवार आणि कोशवाङ्मयाचे गाढे अभ्यासक, संशोधक-समीक्षक डॉ. सु. रा. चुनेकर यांचे एप्रिल महिन्यात निधन झाले. सोलापूरचे कादंबरीकार ल.सी. जाधव यांचेही नुकतेच निधन झाले. उतारवयात लेखनास सुरुवात केलेल्या जाधव यांच्या 'सुंभ आणि पीळ' या कादंबरीस महाराष्ट्र शासनाचा राज्य साहित्य पुरस्कार मिळाला. या सर्व मान्यवर साहित्यिक-विचारवंतांना भावपूर्ण श्रद्धांजली!

म.सा. पत्रिकेच्या गेल्या अंकातील दोन लेखांबाबत काही आरोप झाले. 'वाङ्मयचौर्य' कशास म्हणावे? कॉपीराईट काय असतो? याची काहीही माहिती नसताना आणि ती माहिती जाणकारांकडून न घेता माध्यमांमध्ये सवंग प्रसिद्धीसाठी आरोप करणे हे अशोभनीय आहे. अशा हीन आरोपांनी म.सा. पत्रिका आणि परिषदेच्या प्रतिमेवर काहीही परिणाम होणार नाही. मात्र पीएच. डी. पदवीसाठी अधीर झालेल्या संशोधकांनी पत्रिकेमध्ये लेख देताना हमीपत्र द्यावे. हे लेख इतर कोणत्याही नियतकालिकात आम्हाला सांगितल्याशिवाय देऊ नयेत. संशोधन लेख छापण्यासाठी आम्ही शुल्क आकारत नाही. गुणवत्तापूर्ण लेखांच्या लेखकांना आम्ही सन्मानाने मानधन देतो. काही नियतकालिकांचा जन्मच मुळी संशोधनलेख छापून 'अर्थपूर्ण व्यवहार' करण्यासाठीच झाला आहे. अशांपैकी एकाने आमच्यावर केलेल्या निराधार आरोपांना आम्ही काडीइतकीही किंमत देणार नाही.

या अंकामध्ये डॉ. गो. मा. पवार, डॉ. सु. रा. चुनेकर यांच्यावरील श्रद्धांजलीपर लेखांबरोबरच डॉ. राजा दीक्षित, डॉ. गणेश राऊत, डॉ. दिलीप धोंडगे आणि डॉ. भास्कर ढोके यांचे लेख रसिक वाचकांना नक्की आवडतील. मराठी भाषेच्या उत्कर्षासाठी आणि मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा यासाठी अ.भा. साहित्य महामंडळाचे अध्यक्ष मा. कौतिकराव ठाले पाटील, मसाप पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, माजी संमेलनाध्यक्ष मा. लक्ष्मीकांत देशमुख आणि सर्व साहित्य संस्थांचे पदाधिकारी, सदस्य २४ जूनला आझाद मैदान मुंबई येथे आंदोलन करणार आहेत. या आंदोलनात सक्रिय सहभाग सर्वांनी घ्यावा. सुशिलकुमार शिंदे यांच्या 'शहर आत्महत्या करायची म्हणतंय' या काव्यसंग्रहाला आणि सलीम मुल्ला यांच्या 'जंगल खजिन्याचा शोध' या कादंबरीला युवा साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला. याबाबत त्यांचे हार्दिक अभिनंदन. अ. भा. मराठी साहित्य मंडळाच्या अध्यक्षपदी मा. कौतिकराव ठाले पाटील यांची निवड झाली. त्यांचे हार्दिक अभिनंदन आणि भावी कार्यासाठी शुभेच्छा!

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाईल ॲपवरही उपलब्ध आहे.)











# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे- ४११०३०

## वार्षिक सर्वसाधारण सभेची सूचना

दि. ३०/६/२०१९

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा शनिवार दि. ३१ ऑगस्ट २०१९ रोजी पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात दुपारी ४.०० वाजता परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आली आहे. या सभेला सभासदांनी वेळेवर उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे. सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

### सभेत करावयाची कामे

१. श्रद्धांजली
२. मागील सभेचे इतिवृत्त वाचून संमत करणे.
३. २०१८-२०१९ या वर्षाचे कार्यवृत्त सादर करणे.
४. २०१८-२०१९ या वर्षाचे ताळेबंद आणि उत्पन्न-खर्चपत्रक संमत करणे.
५. २०१९-२०२०चा अर्थसंकल्प संमत करणे.
६. २०१९-२०२० करिता हिशेब तपासनीसांची नेमणूक करणे.
७. अध्यक्षांच्या परवानगीने येणारे आयत्या वेळचे विषय.

आपले,

**प्रकाश पायगुडे**

प्रमुख कार्यवाह

### ● विशेष सूचना ●

१. पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. त्या वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.
२. वरील कामकाजासंबंधी सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा ठराव मांडायचा असेल, तर लेखी स्वरूपात तसे १० ऑगस्ट २०१९ पर्यंत कळवावे. नंतर आलेल्या सूचनांचा विचार केला जाणार नाही.



अनुक्रमणिका








भाषण

दिलीप माजगावकर

# या संक्रमण काळाचा सामना समर्थपणे करायला हवा!

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा जीवन गौरव पुरस्कार स्वीकारताना 'राजहंस प्रकाशन'चे मा. दिलीप माजगावकर यांनी व्यक्त केलेले मनोगत.

हाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या वतीने हा 'जीवनगौरव पुरस्कार' मला देण्यात आला, त्याबद्दल मी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' आणि परिषदेचे सर्व पदाधिकारी यांचे मनापासून आभार मानतो. वास्तविक कोणाला, केव्हाही आणि कोणताही पुरस्कार मिळाला, तरी त्याचा तात्कालिक आनंद होत असतोच, तसा तो मलाही झालाय; पण या पुरस्काराच्या बाबतीत एक विलक्षण योग आलाय आणि म्हणून मला विशेष आनंद झालाय.

तो योग असा की, जी 'महाराष्ट्र साहित्य परिषद' आज आपला ११३ वा वर्धापन दिवस साजरा करते आहे, त्या 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'ची स्थापना १९०६ साली साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षतेखाली इथे जवळच सदाशिव पेठेत मळेकर वाड्यात झाली. त्यावेळी तिथं मराठी ग्रंथकार परिषद भरवण्यात आली, ज्याचंच पुढं 'महाराष्ट्र साहित्य परिषद' असं नामांतर करण्यात आलं आणि योगायोग असा की, ज्या मळेकर वाड्यात ती स्थापन झाली, त्याच मळेकर वाड्यात बरोब्बर ५० वर्षांपूर्वी म्हणजे १९६९ मधे 'राजहंस'चं स्थलांतर झालं. आज परिषदेच्या टिळक रोडवरच्या सभागृहात जो मळेकर वाड्याचा फोटो आपण पाहता, त्यात एका बाजूला 'राजहंस'ची पाटी आपल्याला दिसेल आणि समोरच्या दरवाज्यात २ वर्षांचा माझा मुलगा आपल्याला दिसेल. अशा प्रकारे या संस्थेची जन्मभूमी आणि माझी ५० वर्षांची कर्मभूमी एकच असल्याचा मला आनंद आणि अभिमान आहे.



या जोडीला अजून दोन आनंदाच्या गोष्टी या समारंभात घडल्या आहेत. पहिली म्हणजे हा पुरस्कार कोणाकोणाला मिळाला याची मी मिलिंद जोशी यांच्याकडं चौकशी केली; तेव्हा ते म्हणाले, ''हा पुरस्कार, हा मराठीतल्या बहुतेक सर्व मान्यवर साहित्यिकांनाच दिला गेलाय.'' आणि अर्थात ते योग्य आणि उचितही आहे; पण प्रकाशक म्हणून यापूर्वी तो श्री.पु.भागवत यांना देण्यात आला होता. माझ्या प्रकाशनक्षेत्राच्या वाटचालीत ज्यांचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून मी चालण्याचा प्रयत्न केला, त्यांना मिळालेला सन्मान मला मिळतोय



अनुक्रमणिका

**"या वाटचालीत अनेक मान्यवर साहित्यिकांचे आणि उदयोन्मुख लेखकांचे, फार मोठे योगदान आहे. त्याच्या जोडीला 'राजहंस'कडे असणाऱ्या अनुभवी संपादकीय वर्गाचाही यात मोठा वाटा आहे. आपलं लेखनाचं काम पूर्ण झालं की, लेखक त्या पुस्तकापुरता त्यातून मोकळा झालेला असतो; पण पुढे त्या लेखनाला - त्या पुस्तकाला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व देण्याचं काम प्रामुख्यानं प्रकाशक करत असतो आणि हे काम एकटा प्रकाशक करू शकत नाही, तर अगदी मुखपृष्ठ आणि आतील मांडणी करणाऱ्या कलावंतापासून ते संपादक, मुद्रक, मुदितशोधक आणि बांधणीपर्यंत अनेक जण या व्यापात गुंतलेले असतात. थोडक्यात पुस्तकनिर्मिती हे एक टीम वर्क असतं. पुढे ही निर्मिती वितरक आणि पुस्तक विक्रेत्यांपर्यंत तुमच्या हाती पडत असते. या सगळ्या साखळ्या किंवा कड्या यांना एकत्र जोडण्याचं काम प्रकाशक करत असतो. आज 'राजहंस'ला जी ओळख आणि मान्यता मिळाली आहे त्यात माझा वाटा फार कमी आहे."**

च्चाही मला आनंद वाटतोय. मी असंही मानतो की, माझ्या ग्मित्ताने आम्हा साऱ्या प्रकाशकवर्गाचाही हा सन्मान आहे.

दुसरी आनंदाची गोष्ट म्हणजे मराठीतल्या ज्या निवडक मीक्षकांविषयी माझ्या मनात अतिशय आदराची भावना ाहे, ज्यांची समतोल, ठाशीव आणि अभ्यासपूर्ण समीक्षा ला आवडते; अशांपैकी एक डॉ. सुधीर रसाळ आहेत. वानं त्यांचा आणि माझा संबंध फार उशिरा आला. ामुळं त्यांचं फारसं लेखन मी प्रकाशित करू शकलो ाही; पण त्यांच्या हातून हा पुरस्कार मला मिळाला, याचा ला आनंद आहे.

'राजहंस प्रकाशन' ही मी स्थापन केलेली संस्था नसून ाझ्या थोरल्या बहिणीचे यजमान बाबासाहेब पुरंदरे यांनी थापन केलेली आहे. पुढे श्री.ग.-माझे मोठे बंधू यांनी ाही निवडक पुस्तकांच्या आधारे 'राजहंस'ला ओळख ाप्त करून दिली, ही आता नव्यानं सांगण्याची गोष्ट नाही. ाचबरोबर कोणतीही प्रकाशन संस्था अखेर नावारूपाला ते, नावलौकिक मिळवते ती त्या प्रकाशन संस्थेने कोणती स्तके प्रकाशित केली यातून. अर्थात आपल्या लेखकांच्या ावानेच ओळखली जाते. या वाटचालीत अनेक मान्यवर ाहित्यिकांचे आणि उदयोन्मुख लेखकांचे, फार मोठे ोगदान आहे. त्याच्या जोडीला 'राजहंस'कडे असणाऱ्या नुभवी संपादकीय वर्गाचाही यात मोठा वाटा आहे. ापलं लेखनाचं काम पूर्ण झालं की, लेखक त्या ुस्तकापुरता त्यातून मोकळा झालेला असतो; पण पुढे त्या ेखनाला - त्या पुस्तकाला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व देण्याचं ाम प्रामुख्यानं प्रकाशक करत असतो आणि हे काम एकटा प्रकाशक करू शकत नाही, तर अगदी मुखपृष्ठ आणि आतील मांडणी करणाऱ्या कलावंतापासून ते संपादक, मुद्रक, मुदितशोधक आणि बांधणीपर्यंत अनेक जण या व्यापात गुंतलेले असतात. थोडक्यात पुस्तकनिर्मिती हे एक टीम वर्क असतं. पुढे ही निर्मिती वितरक आणि पुस्तक विक्रेत्यांपर्यंत तुमच्या हाती पडत असते. या सगळ्या साखळ्या किंवा कड्या यांना एकत्र जोडण्याचं काम प्रकाशक करत असतो. आज 'राजहंस'ला जी ओळख आणि मान्यता मिळाली आहे त्यात माझा वाटा फार कमी आहे आणि हे मी खोट्या नम्रपणातून किंवा व्यासपीठावरच्या टाळीसाठी सांगत नाही, तर ही वस्तुस्थिती आहे. 'राजहंस'चं भाग्य असं की, अशी एक सशक्त टीम 'राजहंस'ला बांधता आली, उभी करता आली. या सगळ्यांचा या आजच्या सन्मानात फार मोठा वाटा, फार मोठं योगदान आहे.

वास्तविक अशा सन्मानप्रसंगी सन्मानार्थीनं फार बोलू नये आणि स्वत:बद्दल तर बोलूच नये; पण या निमित्तानं माझी आणि माझ्याप्रमाणेच पुस्तक प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकांची आज नेमकी अडचण काय झालीय, याची फक्त कल्पना देतो. मी सर्व प्रकाशन व्यवसायाबद्दल फार अधिकारवाणीनं मात्र बोलत नाही. त्यातही महागाई, नोटाबंदी, जीएसटी या व्यावहारिक गोष्टींबद्दलही मी बोलणार नाही. याची दोन कारणं- एक म्हणजे हे त्यासाठीचं व्यासपीठ नाही आणि दुसरं म्हणजे अशा स्वरूपाच्या अडचणी सर्वच व्यवसायात कमी-जास्त प्रमाणात येत असतात. ती मंडळी त्यातून मार्ग काढत असतात. तसाच

**“आज मराठीपुरतं बोलायचं, तर ई-बुक्स, ऑडिओ बुक्स यांचा प्रसार मर्यादित असला, तरी नजीकच्या काळात तो निश्चित वाढणार आहे. छापील पुस्तकांना हे पर्याय असणार आहेत. त्याच्याशी स्पर्धा न करता त्याच्याशी जमवून घेणं, तिथल्या केवळ तंत्रज्ञानापुरत्याच नाहीत; तर विषय, आशय आणि तो सादर करण्याच्या पद्धती यांविषयीच्या गरजा पूर्ण करणारी यंत्रणा उभी करणे हे आवश्यक होणार आहे. मग त्यासाठीचे विषय असतील, लेखक असतील, लेखन शैली असेल, त्याचं लेखनशास्त्र असेल - हे शिकून घ्यावं लागेल. तसे लेखक शोधावे लागतील, संपादक शोधावे लागतील. हे एका अर्थी छापील पुस्तकांना समांतर जाणारं माध्यम असणार आहे. तरीही या पुढच्या काळात छापील पुस्तकांचं महत्त्वही कमी होणार नाही. आज जगभरचे पाहणी अहवाल हेच सांगतात; पण या पुढे केवळ छापील पुस्तकांवर अवलंबून राहता येणार नाही, त्याला या नव्या माध्यमांची जोड द्यावी लागणार आहे.”**

मार्ग आम्हालाही काढावा लागेल.

अगदी अलीकडच्या काळापर्यंत असं म्हणता येईल की, पुस्तक प्रकाशन आणि लेखन-वाचन संस्कृती यांचं नातं एका नाण्याच्या दोन बाजू असाव्यात इतकं घट्ट होतं; पण आता मात्र वेगवेगळ्या दृकश्राव्य माध्यमांमुळे, इंटरनेट आणि सोशल मिडियामुळे पुस्तकांची आणि वाचकांची दुनिया एका विचित्र कोंडीत सापडली आहे. काही काळ का होईना पुस्तकांची विक्री कमी होताना दिसतेय, तर दृकश्राव्य या माध्यमांचं आकर्षण वेगानं वाढताना दिसतंय. ई-बुक आणि ऑडिओ बुक ही अशा बदलाची दोन ठळक उदाहरणं आहेत.

या आणि अशा स्वरूपाच्या बदलांकडे आम्ही कसे पाहतो, ते कसे आत्मसात करतो, नव्या तंत्रज्ञानाशी कसं जमवून घेतो यावर आमचा पुढचा प्रवास आता ठरणार आहे.

आज मराठीपुरतं बोलायचं, तर ई-बुक्स, ऑडिओ बुक्स यांचा प्रसार मर्यादित असला, तरी नजीकच्या काळात तो निश्चित वाढणार आहे. छापील पुस्तकांना हे पर्याय असणार आहेत. त्याच्याशी स्पर्धा न करता त्याच्याशी जमवून घेणं, तिथल्या केवळ तंत्रज्ञानापुरत्याच नाहीत; तर विषय, आशय आणि तो सादर करण्याच्या पद्धती यांविषयीच्या गरजा पूर्ण करणारी यंत्रणा उभी करणे हे आवश्यक होणार आहे. मग त्यासाठीचे विषय असतील, लेखक असतील, लेखन शैली असेल, त्याचं लेखनशास्त्र असेल - हे शिकून घ्यावं लागेल. तसे लेखक शोधावे लागतील, संपादक शोधावे लागतील. हे एका अर्थी छापील पुस्तकांना समांतर जाणारं माध्यम असणार आहे. तरीही या पुढच्या काळात छापील पुस्तकांचं महत्त्वही कमी होणार नाही. आज जगभरचे पाहणी अहवाल हेच सांगतात; पण या पुढे केवळ छापील पुस्तकांवर अवलंबून राहता येणार नाही, त्याला या नव्या माध्यमांची जोड द्यावी लागणार आहे.

प्रश्न असा आहे की, हे भोवताली जे बदल होतायंत त्याचा वेग इतका प्रचंड आहे की, त्याच्याशी जमवून घेताना आमची दमछाक होतेय; पण यावर आम्हालाच तोडगा काढावा लागणार आहे. या गोष्टीची प्रकाशकांना कल्पना नाही, असं मी म्हणणार नाही; पण यापुढे हे काम अधिक वेगानं हाती घ्यावं लागेल. तसा उशीर झालाच आहे, तो अधिक होऊन चालणार नाही.

या जोडीला अजून एक गोष्ट आम्हाला करता येणं शक्य आहे -ती म्हणजे ही आधुनिक माध्यमं आत्मसात करून आजवरच्या वाङ्मयीन वाटचालीचा सांधा नव्या युगाशी कसा जोडून घ्यायचा, हा विचार करावा लागेल. यात आम्ही नव्या माध्यमातून नवी पुस्तकं, नवे विषय, नवे लेखक हे तर पोचवणं अपेक्षित आहेच; पण आजवर जी अभिजात पुस्तकं मराठीत प्रकाशित झाली, तीही जगभर पसरलेल्या मराठी वाचकवर्गापर्यंत न्यायला हवीत. उदाहरणच द्यायचं, तर लक्ष्मीबाई टिळक यांचं 'स्मृतीचित्रं' हे पुस्तक ऑडिओ स्वरूपात आकर्षक वाचनातून वाचकापर्यंत गेलं; तर कोणीही ते ऐकू, वाचू शकेल. पुढच्या वर्षी लोकमान्यांची स्मृतिशताब्दी आहे. न. चिं. केळकरांनी तीन खंडांत टिळक चरित्र लिहिलं आहे. योग्य संपादन आणि आकर्षक वाचनातून ते सादर करणं सहज शक्य आहे. अशी

अगदी पन्नास पुस्तकं आपण सादर केली, तरी वाचनसंस्कृतीसाठी ते मोठं काम होऊ शकेल.

आज जगभरातून छापील पुस्तकं प्रकाशित होत असताना, त्याचवेळी त्यांच्या ई-आवृत्त्याही प्रकाशित होत असतात. त्या स्वस्त असतात, त्यात ओझं बाळगायचं नसतं. हे म्हणजे पूर्वी हार्डबाऊंड आवृत्तीचं प्रकाशन होत असताना पेपर बॅक आवृत्त्याही प्रकाशित होत असत, तसंच आहे. अशा प्रयोगाचं अर्थकारणही व्यवहारात आणायचं आहे.

या नव्या माध्यमांच्या आगमनानं केवळ मराठीच नव्हे, तर जगभराच्या वाचनसंस्कृतीत उलथापालथ होते आहे. एका अर्थी हा संक्रमणाचा काळ आहे. या संक्रमणाला विचकून चालणार नाही, तर हे बदल आपल्याला स्वीकारून आणि ते आत्मसात करूनच यातून मार्ग काढावा लागणार आहे. शेवटी प्रत्येक काळाची म्हणून अशी काही आव्हानं असतात आणि त्या काळात वावरणाऱ्या सर्वांनाच त्याचा सामना करावा लागतो. हा सामना समर्थपणे करायचा असेल, तर आम्ही प्रकाशक मंडळींनी प्रथम एक गोष्ट करायला हवी ती म्हणजे - पूर्वी असं होतं, पूर्वी तसं होतं, पूर्वी फार कसदार लेखन करणारे लेखक होते, आता फार उथळ लेखन करणारे लेखक आहेत, पूर्वी फार मोठा वाचक वर्ग होता, आता तो नाही,- हे असे उसासे टाकणं बंद करायला हवं, आताही कसदार लेखन करणारा तरुण लेखकवर्ग ग्रामीण भागातून येतो आहे. तो शोधायला हवा, त्याच्यापर्यंत पोचायला हवं. आताही वाचक वर्ग आहे. अनेक प्रकाशकांच्या निवडक पुस्तकांच्या आवृत्त्या अल्पावधीत संपतात. हे कशाचं लक्षण आहे ? पूर्वीचा काळ फार मनोहारी होता आणि आताचा नाही असं म्हणणं, म्हणजे 'पूर्वी वर्फ फार गार होता' असं म्हणण्यासारखं आहे. या छायेतून जितके लवकरात लवकर आपण बाहेर पडू; तितक्या लवकर आपण नव्या काळाच्या आव्हानांना सामोरे जाऊ, हा विश्वास मी या ठिकाणी व्यक्त करतो आणि थांबतो.

●

---

जाहिरातीचे दरपत्रक

**सप्रेम नमस्कार!**

महाराष्ट्र साहित्य पत्रिका हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे मुखपत्र असून मराठी साहित्य-संस्कृतीचे प्रतिनिधित्व करणारे त्रैमासिक आहे. म.सा.पत्रिकेला १०४ वर्षांची दीर्घ परंपरा लाभली आहे. म.सा.पत्रिकेत मराठी साहित्याच्या विविध प्रवाहांचा आणि प्रकारांचा परामर्श घेतला जातो. पत्रिकेने विशेषांकही प्रकाशित केले आहेत. साहित्यसंशोधनविषयक लेख पत्रिकेतून नियमितपणे प्रकाशित केले जातात.

ग्रंथपरीक्षणे आणि वाङ्मय समालोचन करणारे लेख पत्रिकेमध्ये प्रसिद्ध होतात. समकालीन साहित्य व्यवहारावर म.सा.पत्रिकेतून भाष्य केले जाते. संशोधक, विद्यार्थी आणि मराठी रसिक यांनी सदैव पत्रिकेला उदंड प्रतिसाद दिला आहे. महाराष्ट्रातील सर्व थरांतील रसिक वाचक पत्रिका वाचतात. १३,५०० प्रती इतक्या संख्येने पत्रिका छापली जाते आणि आजीव सभासदांना अंक मोफत पाठविला जातो. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेला आपल्या व्यवसायाची, प्रकाशनांची अथवा शुभेच्छापर संदेशांची जाहिरात देऊन पत्रिकेला आर्थिक दृष्ट्या सक्षम करावे, ही विनंती.

**- प्रकाशक आणि संपादक ( म.सा.पत्रिका)**

**जाहिरातीचे दरपत्रक**

| | |
|---|---|
| **कव्हर २ (रंगीत)** | **रु.१०,०००/-** |
| **कव्हर ३ (रंगीत)** | **रु.१०,०००/-** |
| **मलपृष्ठ ४ (रंगीत)** | **रु.१०,०००/-** |
| **आतील पान (कृष्णधवल)** | **रु. ४,०००/-** |
| **आतील अर्धे पान (कृष्णधवल)** | **रु. २,०००/-** |
| **आतील पाव पान (कृष्णधवल)** | **रु. १,०००/-** |



लेख

डॉ. दिलीप धोंडगे

# कादंबरीचे अध्यापन

कादंबरी या साहित्य प्रकाराचे अध्ययन-अध्यापन कसे करावे, याबाबत मूलगामी विवेचन करणारा लेख.



दंबरी या वाङ्मयप्रकाराचे अध्यापन म्हणत असताना शिक्षकासाठी अध्ययनदेखील अभिप्रेत आहे. यामुळे कादंबरी या वाङ्मयप्रकाराचे अध्ययन-अध्यापन असे म्हणणे उचित होईल असे वाटते. या निबंधात असे अध्ययन-अध्यापनाचे प्रारूप मांडले आहे.

वाङ्मयप्रकाराचे अध्ययन-अध्यापन करण्यासाठी अभिप्रेत हेतू: वाङ्मयप्रकाराचे वाङ्मयीन अध्ययन कसे करावे याचा संस्कार करण्यासाठी अध्यापकाने वाङ्मयीन अध्ययन करून अध्यापन करणे हा हेतू असतो.

वाङ्मयप्रकाराचे वाङ्मयीन अध्ययन करताना वाङ्मयाच्या संकेतव्यवस्थेचे ज्ञान होते. असे ज्ञान झाले, तरच वाङ्मयाचा आस्वाद, आकलन आणि मूल्यमापन करता येऊ शकते. हे ज्ञान अध्यापकाला प्राप्त करून घेता आले, तरच नेमके मार्गदर्शन करता येईल.

विद्यार्थ्यांची अध्ययन पार्श्वभूमी ध्यानात घ्यावी लागेल.

प्रथम वर्षाच्या विद्यार्थ्यांची पूर्वतयारी करून घ्यावी लागेल. परिचित गोष्टींचा पूर्वज्ञान म्हणून उपयोग करता येऊ शकतो. ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या अध्ययन पार्श्वभूमीचा गांभीर्याने विचार करावा लागतो. कोरी पार्श्वभूमी कधीच नसते. इतर मौखिक संकेतव्यवस्था त्यांना परिचित असतात. रामायण-महाभारतादी महाकाव्ये काही ढोबळ घटनाप्रसंगापुरती माहिती असतात. महाकाव्याचे गद्यरूप-महागद्यरूप-कादंबरीप्रत कसे पोचले याचे स्थूल विवेचन करता येऊ शकते.

निवडक कादंबऱ्यांची यादी करून ती वाचण्याचे आवाहन करता येते. कोणी वाचलेल्या असल्यास त्यांचा अदमास घेता येतो. वर्गात संभाषणाच्या रूपाने हे घडल्यास एक चांगले अध्ययन वातावरण तयार होते. कथेच्या अभ्यासाची पार्श्वभूमीही ध्यानात घेता येऊ शकते.

द्वितीय, तृतीय आणि पदव्युत्तर वर्गातील विद्यार्थ्यांची अध्ययन पात्रता क्रमशः वाढत जाते. त्यामुळे स्थूल अभ्यासाकडून सूक्ष्म अभ्यासाकडे ओघानेच जावे लागते.

**कादंबरीच्या अध्ययन-अध्यापनाची उद्दिष्टे :**

- वाङ्मयप्रकारांच्या वर्गीकरणाची तत्त्वे स्थूल/सूक्ष्म जाणून घेऊन परिचित करून देणे. अध्यापकाच्या अध्ययनाचा पोत घट्ट/पीळदार असेल; पण



**“ वाङ्मयप्रकारांच्या वर्गीकरणाची तत्त्वे स्थूल/सूक्ष्म जाणून घेऊन परिचित करून देणे. अध्यापकाच्या अध्ययनाचा पोत घट्ट/पीळदार असेल; पण अध्यापनाचा पोत मात्र एकेक पदर उलगडणारा असेल. मातृसंमित अध्यापन जास्ती भावते. कादंबरी या वाङ्मयप्रकाराची लक्षणे, व्याख्या, प्रकार-उपप्रकार जाणून घेऊन परिचित करून देणे. कादंबरी या वाङ्मयप्रकाराच्या आस्वादनाचा अध्यापकाचा चिंतनगर्भ अनुभव प्रस्तुत करणे, वाङ्मयप्रकारागणिक असलेल्या आस्वादन भेदाचे तौलनिक विवेचन करता येऊ शकते; ते करणे. प्रकारनिष्ठ आस्वादनरीत परिचित करून देणे. कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा उगम, त्याची स्थित्यंतरे-व्युत्यंतरे, ऐतिहासिक परिप्रेक्ष्य, संस्कृतिसंबद्धता याचा नीट विचार करून विद्यार्थ्यांपुढे ही माहिती गरजेनुसार प्रस्तुत करणे. ही सर्व उद्दिष्ट्ये इतर वाङ्मयप्रकारांच्या तुलनेत अधिक व्यवस्थित स्पष्ट करता येऊ शकतात. म्हणून तसा प्रयत्न करणे. ”**

अध्यापनाचा पोत मात्र एकेक पदर उलगडणारा असेल. मातृसंमित अध्यापन जास्ती भावते.

- कादंबरी या वाङ्मयप्रकाराची लक्षणे, व्याख्या, प्रकार-उपप्रकार जाणून घेऊन परिचित करून देणे.

- कादंबरी या वाङ्मयप्रकाराच्या आस्वादनाचा अध्यापकाचा चिंतनगर्भ अनुभव प्रस्तुत करणे, वाङ्मयप्रकारागणिक असलेल्या आस्वादन भेदाचे तौलनिक विवेचन करता येऊ शकते; ते करणे. प्रकारनिष्ठ आस्वादनरीत परिचित करून देणे.

- कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा उगम, त्याची स्थित्यंतरे-व्युत्यंतरे, ऐतिहासिक परिप्रेक्ष्य, संस्कृतिसंबद्धता याचा नीट विचार करून विद्यार्थ्यांपुढे ही माहिती गरजेनुसार प्रस्तुत करणे.

- ही सर्व उद्दिष्ट्ये इतर वाङ्मयप्रकारांच्या तुलनेत अधिक व्यवस्थित स्पष्ट करता येऊ शकतात. म्हणून तसा प्रयत्न करणे.

**२. अध्ययन-अध्यापनाचे विश्लेषण : स्थूल पातळी :**

अ) कादंबरी : वाङ्मयप्रकार- नेमलेली कादंबरी

आ) सैद्धांतिक विचारव्यूह : कथात्म प्रकार

तुलना इतर प्रकार :

तुलनेची तत्त्वे :

भारतीय, पाश्चात्त्य विचारपरंपरा- गद्य-पद्य या पायाभूत भाषिक तत्त्वांचा परिचय करून घेणे व देणे.

इ) कादंबरी : वाङ्मयप्रकार :

कामचलाऊ व्याख्या - सर्वसमावेशक व्याख्या

संकेतव्यूह

महाकाव्य- कादंबरी

कथा- कादंबरी : परस्परसंबंध

कादंबरी-कविता, निवंध, ललित गद्य - तुलना

ई) कादंबरीची संरचना :

कथानक

पात्र

वातावरण

लेखकाचा दृष्टिकोन

भाषा

निवेदनपद्धत

उ) कादंबरीचे प्रकार : स्थूल

सामाजिक

ऐतिहासिक

पौराणिक

प्रादेशिक

काव्यात्म

आत्मचरित्रात्मक

संज्ञाप्रवाहात्मक

विज्ञान

सामाजिक - ग्रामीण- दलित असेही कोणी करील.

या सर्व स्तरांवरून नियुक्त कादंवरीचे अध्यापकाला अध्ययन करावे लागेल; पण सूक्ष्म अध्ययन अजून पुढे आहे व त्याच्या जोरावरच अध्यापन करावयाचे असते.

**अध्ययन-अध्यापन : सूक्ष्म पातळी :**

या सूक्ष्म पातळीवर अध्यापकाला अधिक अध्ययनशील झाल्याशिवाय गत्यंतर नाही.

**कादंबरी :**

वाङ्मयप्रकाराचा स्वरूप आणि रचनेचा अभ्यास

संरचनावादी दृष्टीने (Structural Analysis)

संरचनेचे घटक २.ई मध्ये मांडलेले आहेत.

प्रकाराचे हे व्यवच्छेदकत्व आहे



अनुक्रमणिका

प्रकारनिष्ठ अध्ययनाचे व्यवच्छेदकत्व

व्यवस्था आणि संकेत हे द्वैत

सस्यूरच्या एककालिक दृष्टिकोनाचा आधार

Langue आणि Parole

भाषाव्यवस्था आणि भाषिक वर्तन.

**रोलाँ बार्तस्‌ची महाकाव्याची कल्पना - विश्लेषणाच्या पातळ्या :**

कथेचे घटक

पात्रे

निवेदन

**जेरार्द जेनेचे संरचनेचे विश्लेषण - त्याच्या पातळ्या :**

कथा - चिन्हार्थ

कथासंहिता - चिन्हक

निवेदन

**तोदोरोव्ह यांचे संरचनेचे विश्लेषण - पातळ्या :**

रचना

शब्द

अर्थ

इत्यादी. अध्यापकाला ही अध्ययनसामग्री जमवावी लागेल.

कादंबरी - संहिता (Novel as a text)

कादंबरी - पारिभाषित (Novel as a discourse)

या भेदाच्या स्पष्टतेसाठी अध्ययनशील राहिल्याशिवाय गत्यंतर नाही. आपल्या अध्यापनाला बहुस्वरीयता प्राप्त व्हावी यासाठी हे फारच आवश्यक आहे.

कादंबरी : एकजिनसी संघटना : कलालक्ष्यी :

संरचनेचा एकजिनसी संघटना म्हणून प्रत्यय घेता आला पाहिजे. संरचनेतील घटकांची एकजिनसी संघटना कालावकाश साकारत असते. कादंबरीतील वातावरण, कालावकाश, कथात्मता (Fictionality) यांच्या परस्परसंबंधांचा विचार करता आला पाहिजे.

मिखाईल बाख्तिन यांच्या कालावकाश संकल्पनेच्या साहाय्याने सेंद्रिय रूपबंधाचा विचार करता येऊ शकतो.

**एकजिनसी संघटनेत :**

कृतींमधून पात्रांचे साकार होणे.

काळ आणि अवकाश यांच्या संमिश्रणातून कादंबरी सरूप होणे.

वर्णन, निवेदन, भाष्य या निवेदनपद्धतींचा विचार करून कथनपद्धतीचा विचार करणे. (narratology)

नायक, प्रतिनायकादी संकल्पना पारिभाषितातून कळणे, इत्यादी. कादंबरीचा रूपबंध आणि साहित्याचा प्रकार म्हणून कादंबरी यांचे व्यवच्छेदकत्व कळणे महत्त्वाचे.

**कादंबरी : जीवनलक्ष्यी**

कादंबरीचा संरचनात्मक अभ्यास हा कलालक्ष्यी होतो.

त्यातून कलामूल्ये उदित होतात.

कादंबरीची प्रतीती ही जीवनलक्ष्यी असते.

त्यामुळे जीवनमूल्ये मिळतात.

ऐतिहासिक, पौराणिक, दलित ग्रामीण विशेषणे कादंबरीचे जीवनलक्ष्यीत्व सूचित करतात.

कालावकाशाच्या प्रकाशात त्यांचे ज्ञान करून घ्यावे लागते.

इतिहास, पुराणे, सामाजिक संरचनेचे ज्ञान, भारतीय-महाराष्ट्रीय जीवन, प्रादेशिक जीवन यांचे ज्ञान मिळवून समन्वय साधावा लागतो. जीवनाकलनासाठी ते आवश्यक असते.

**कादंबरी : प्रेरणा, परंपरा आणि वृत्ती :**

- कादंबरी या वाङ्मय प्रकाराचा उगम - परिस्थिती - प्रेरणा
- यमुनापर्यटन - मुक्तामाला - मंजुघोषा
- त्रिविध प्रेरणांचे स्पष्टीकरण
- हरिभाऊंची कादंबरी - प्रेरणा- परंपरा
- फडके, खांडेकर यांच्या कादंबरी प्रेरणा
- नवकादंबरी

-संरचनात्मक आणि प्रेरणा प्रवृत्ती यांनुसार झालेले बदल. दीडशे वर्षांच्या कालखंडातील प्रेरणा-प्रवृत्ती आणि आकृतिबंध यांचा समन्वित विचार करणे.

विशिष्ट कादंबरीचे वाङ्मयकृती म्हणून विश्लेषण करताना हे सर्व संदर्भ नीटपणे ध्यानात घ्यावे लागतात.

**अध्यापन : प्रत्यक्ष :**

- वाचन : अध्यापकाचे :

वर्गातील प्रकट - भागशः (episodic) - वाचनाला कथन, निवेदनाची अंगभूत परिमाणे देणे आवश्यक

- वाचन : सलग - स्थूल

खंडित - सूक्ष्म

संरचनावादी, रूपवादी, भाषिक घटकांच्या स्पष्टीकरणासाठी

वाचन - पुनर्वाचन = एकेक मुद्दा स्पष्ट होण्यासाठी

वाचन - विश्लेषण = निकट वाचन

वाचन- आस्वादन = निकट वाचन

वाचन-मूल्यमापन = निकट वाचन

वाचन आणि पुनर्वाचन यांद्वाराच आपण संहितेकडून पारिभाषिताकडे जाऊ शकतो.

यासाठी गृहपाठ म्हणून - अध्ययन-अध्यापन सामग्रीचे नियोजन करावे लागेल. वाचनांश व त्याद्वारा स्पष्ट करावयाच्या बाबी निश्चित कराव्या लागतील. उपलब्ध तासिका आणि अध्यापन-घटक यांचे प्रमाण. भावकवितेचे विश्लेषण आणि कादंबरी यांच्या विश्लेषणात फार भेद उरत नाही; कारण दोन्हींचे विश्व हे भाषिकच असते.

भाषेतील शब्द - अर्थ

वाक्य - अर्थ

याशिवाय यांच्या परस्परसंबंधातून, आघात, सुरावली, विराम वगैरेंतून लय-ताल-भाव जागृत होतात. यासाठी विरामचिन्हांचे वाचनही करता आले पाहिजे.

वाचन हाच सर्व अध्ययन-अध्यापन व्यवहाराचा पाया आणि कळस आहे.

**समीक्षा आणि अध्ययन-अध्यापन :**

समीक्षा आणि अध्ययन-अध्यापन यात फरक आहे. अध्यापकाने समीक्षेच्या वाघाच्या शिकारीची तयारी ठेवली, तरच त्याला अध्यापनाच्या सशाची शिकार करता येईल.

समीक्षा- परक्याची ही परभृतता असते.

समीक्षेचा आपला अवकाश उभारायला हवा- तो इतरांच्या मदतीने उभारता येईल. - पण परभृतता नको.

समीक्षेच्या प्रकाशात अध्ययन-अध्यापन व्हावे; म्हणजे समीक्षा लादली जात नाही.

अध्ययन-अध्यापनातून समीक्षेची वृत्ती तयार व्हायला हवी. समीक्षेची परिभाषा वापरणे म्हणजे समीक्षा लादणे नव्हे. वाङ्मयाच्या अध्यापनात पारिभाषिक संज्ञा वापरायलाच हव्यात. भारतीय आणि ग्रीक या दोन्ही परंपरांत संज्ञांना प्रत्येकी अडीच हजार वर्षांची परंपरा आहे. तो काटेकोरपणा आपण का नाकारावा ?

**संश्लेषण की विश्लेषण ?**

विश्लेषणच. संश्लेषणासाठी विश्लेषण.

विश्लेषण. हे dialogue based असते.

संश्लेषण dialect च्या स्वरूपाचे असते.

विश्लेषणाशिवायचे संश्लेषण हे मनःपूत होऊन अकथात्म होते.

कथात्मता ही जंगलासारखी असते. विशिष्ट संदेश साधण्याच्या नादात जंगलाचे भान विसरणे, परवडणारे नाही.

विश्लेषणातून कलेच्या घडणीचे भान येते.

विश्लेषणोत्तर संश्लेषणातून कलेच्या प्रभावाची जाणीव होते.

प्रभाव वचनीय-अनिर्वचनीय असू शकतो.

**वाङ्मयकृतीचे मूल्यमापन :**

कलामूल्ये व जीवनमूल्ये यांच्या समवायातून होते. तुलनेने होते. समभाषिक, परभाषिक कृतींची तुलना विश्लेषणातून जाणवणाऱ्या परस्परसंबंधातून साकारणाऱ्या कथात्मतेने होते.

मूल्यवाचन म्हणजे कृती श्रेष्ठ, थोर, महान, ढोबळ, रचना -कारागिरी- विश्लेषणानेच कळते.

व्याख्यान पद्धत आणि विश्लेषण यांचे कसे जमावे ?

विश्लेषण पद्धत ही practical teaching learning पद्धत आहे.

संहितेचे निकट वाचन करून ती समीक्षेच्या छत्राखालच्या दिशांनी पिंजल्याशिवाय आपण वाङ्मयप्रकाराचे भान आणून देऊच शकत नाही.

माझ्या विवेचनाला पुष्टी मिळाली, तर विश्वास बसेल. यास्तव डॉ. द. भि.कुलकर्णींचे एक मत उद्धृत करून हे विवेचन संपवतो. डॉ. द. भि. कुलकर्णी म्हणतात-

"एखाद्या भावकवितेप्रमाणेच- कुठल्याही ललित, साहित्यकृतीप्रमाणेच कादंबरीचे कादंबरीपण तिच्या शब्दाशब्दांत- प्रत्येक शब्दाच्या उच्चारात, स्थानात आणि व्यंग्यार्थात-सामावलेले असते. शब्दाशब्दांतून साकारणाऱ्या व्यंग्यार्थ- त्या व्यंग्यार्थाची लयतत्त्वानुसार होणारी संघटना- त्या संघटनेचे घटक म्हणून वावरणारे दृश्य आकार, श्राव्य नाद, कालतत्त्व, तर्कतत्त्व या साऱ्यांचे पूरक स्थान आणि प्रयोजन इत्यादींचा शोध म्हणजे खरोखर कादंबरीसमीक्षा होय; पण हे किती जड आहे. तसे करावयाचे म्हणजे एकेका कादंबरीप्रीत्यर्थ त्या त्या कादंबरीपेक्षाही अधिक समीक्षाग्रंथ लिहिणे होय."



अनुक्रमणिका



लेख

प्रा. डॉ. भास्कर ढोके

संत कबीर यांच्या तत्त्वज्ञानाचे विवेचन करणारा लेख.

# संत कबीर एक परिप्रेक्ष

महाराष्ट्र ही संतांची भूमी आहे, असे म्हटले जाते. ते खरेही आहे. ज्ञानेश्वर, नामदेव आणि चक्रधरांपासून सुरू झालेली ही परंपरा दीर्घ आहे. साहजिकच संतसाहित्य हा मराठी भाषेचा फार मोठा ठेवा आहे. महाराष्ट्रात १३व्या शतकात निर्माण झालेल्या संत परंपरेला आणि वारकरी चळवळीला दक्षिणेतील अलवारांची परंपरा चळवळ प्रेरणादायी ठरली आहे, असे काही अभ्यासकांना वाटते. ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीनंतर धर्मप्रसाराच्या प्रेरणेने संत नामदेव उत्तरेकडे गेले. नामदेवांनी आपल्या कार्याने गुजरातमधील नरसी मेहतांपासून अनेक संतांना प्रभावित केले, असे मानले जाते. एवढेच नाही, तर काही अभ्यासकांच्या मते हिंदी साहित्यातील 'भक्तिकाव्या'ची सुरुवातही नामदेवांपासूनच झाली. इ.स.१२७० ते १३७५ असा जीवनकाळ असलेल्या नामदेवांचा उल्लेख प्रस्तुत निबंधात करण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे संत कबीरदास यांनी नामदेवाचीच भक्ती परंपरा पुढे वृद्धिंगत केली.

मध्ययुगातील भारतीय संत परंपरा समजून घ्यायची असेल, तर सर्वप्रथम तत्कालीन सामाजिक, राजकीय आणि धार्मिक परिस्थिती विचारात घ्यावी लागते. तरच खऱ्या अर्थाने आपल्याला मूल्यमापन करता येते. मराठी साहित्यात आणि समाजमनात जे स्थान संत तुकारामांचे आहे तेच स्थान उत्तरेकडे संत कबीरांचे आहे. संत कबीर हे एक क्रांतिकारक संत होते, असे म्हटले जाते. त्यांचे क्रांतिकारकत्व समजून घ्यायचे असेल, तर अनेक अंगांनी विचार करावा लागतो, आढावा घ्यावा लागतो.

संत कबीर (इ.१३९८-१५१८ / इ.१३९८-१४९४) यांच्या काळाचे एकूण चित्र पाहता असे निदर्शनास येते की, हा सगळाच इस्लामच्या आक्रमणाचा आणि मुस्लिम राजवटी स्थिरावण्याचा कालखंड होता. मुहम्मद तुघलक (इ.१३२५-१३५१) अल्लाउद्दीन खिलजी याचे हल्ले भारतावर होत होते. बरोबर संत कबीरांच्या जन्माच्याच वर्षी इ.१३९८ मध्ये तैमुरलंगाचे दिल्लीवर आक्रमण झाले होते. अल्लाउद्दीन खिलजीसारख्या प्रचंड धर्मांध राजवटींचा कहर माजलेला होता. मंदिरे पाडली जात होती. मंदिरांमधील संपत्ती लुटली जात होती. स्त्रिया सुरक्षित राहिल्या नव्हत्या आणि शेतकरी प्रचंड कर भरून हैराण झालेला होता.

इस्लामिक राजवटीतले काही अपवाद वगळता बहुतांश राजे भोगविलासी





अनुक्रमणिका

होते. चितोडची राणी पद्मिनी हिच्या सौंदर्याची चर्चा ऐकून घायाळ झालेल्या अल्लाउद्दीनने चित्तोडगडावर दोन वेळेस राणी पद्मिनीला प्राप्त करून घेण्यासाठी हल्ले केले. अशा स्थितीत हिंदू समाज मोठ्या प्रमाणात गलितगात्र झालेला होता आणि कर्मकांडांच्या प्रचंड आहारी गेला होता. हा सगळा तांत्रिक काल होता. म्हणजेच तत्कालीन समाजामध्ये तंत्रमार्गाचा मोठा प्रभाव होता. वैदिक (शाक्त, शैव आणि वैष्णव), अवैदिक (बौद्ध, जैन) परंपरेतील सगळेच तंत्र मार्गाच्या आहारी गेले होते. तांत्रिक सृष्टी तत्त्व, तांत्रिक देवमंडल, तांत्रिक यंत्र-विधान, तांत्रिक मंत्रसाधना, आचार विधान, हटयोगी साधना मोठ्या प्रमाणात सुरू होती. तत्त्वचिंतनापेक्षा साधना पद्धतीलाच जास्त महत्त्व प्राप्त झाले होते. आपापल्या उपासनापद्धतीच श्रेष्ठ असल्याचे सिद्ध करण्याची, प्रचार व प्रसार करण्याची अतिरेकी प्रवृत्ती फोफावत होती. त्यातूनच आपापल्या उपास्य देवता ह्याच सृष्टीतत्त्व असून त्यांच्या प्राप्तीसाठी देवदेवतांचे प्रतीक असलेल्या बीजाक्षर आणि वर्णांचा उच्चार करणे, भूतसिद्धी, कुंडलिनी योग, रहस्यमय साधना आणि गूढ वामाचार होत असत. धर्म आणि पंथ कोणताही असो, तो तंत्रमार्गात होता. फरक एवढाच होता की, प्रत्येकाने आपापल्या पद्धतीने या विधींना परिभाषा दिली. शैवांनी शैव परिभाषा दिली, तर वैष्णव आणि बौद्धांनी आपापली. या सगळ्यांतून अपरिहार्यपणे संपूर्ण समाजच अधोगतीला जात होता. यातून कुणीच सुटले नव्हते. यात सिद्ध होते, तीर्थव्रती होते, मुनी होते, पीर, दिगंबर, योगी, जंगम, ब्राह्मण, संन्यासी सगळेच मार्या आणि कर्मकांडामध्ये अडकले होते.

या पार्श्वभूमीवर आपल्याला कबीरदासांच्या कार्याकडे पाहावे लागते. त्यांच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन वरील परिस्थितीच्या परिप्रेक्षात करावे लागते. कबीरांचे मोठेपण त्यांच्या पौराणिक हिंदू धर्माच्या कर्मकांडावर आणि आचार पद्धतीवर हल्ला चढवला एवढ्यापुरतेच मर्यादित नाही, तर त्यापेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे त्यांनी प्रार्थनेचा सोपा मार्ग सांगितला. समाजाच्या मुक्तीचा नवा मार्ग सांगितला; जो समन्वयवादी होता, सोपा होता आणि समाजाला पुढे घेऊन जाणारा होता.

*जातिपाँतीं पूछै नहिं कोई।*
*हरी को भजै सो हरिका होई।*

इतका सोपा धर्म कबीरांनी सांगितला. माणसाचे मोठेपण कर्माने ठरते, त्याच्या जन्माने नाही, हे महत्त्वाचे तत्त्व सांगत माणसाला माणूस म्हणून जगण्याचा समान हक्क प्रस्थापित करण्याचा मार्ग दाखवला.

असे हे क्रांतिकारक संत कबीर 'जुलाहा' या जातीतला होते, जी विणकाम करणारी जमात आहे. भारतात विणकाम करणाऱ्या एकूण बावीस जाती आढळतात. त्यातील गुजराथ आणि बंगालमधील काही जाती वगळता सगळ्या मागासच मानल्या जातात. कबीरांचा जो कालखंड आहे त्या कालखंडात काही काळ अगोदरच 'जुलाहा' या जातीने सामूहिक धर्मांतर केले असावे असे अभ्यासकांचे मत आहे. स्वधर्मात मानाचे स्थान मिळत नाही या शल्यातून एवढ्या मोठ्या समाजसमूहाने धर्मांतर करून सन्मानाच्या अपेक्षेने इस्लाम स्वीकारला असावा.

कबीरांची वाणी आणि त्यांच्या प्रेरणा समजून घेण्यासाठी ही पार्श्वभूमी विचारात घ्यावी लागते. बहुतेक इस्लाम स्वीकारूनही त्यांच्या जातीला समाजात फार मानाचे स्थान प्राप्त झाले होते असे दिसत नाही. निराशा आणि तो भ्रमनिरास कबीरांच्या वाणीत शोधता येतो का हे

■ ■ **कबीरांचे मोठेपण त्याच्या पौराणिक हिंदू धर्माच्या कर्मकांडावर आणि आचार पद्धतीवर हल्ला चढवला एवढ्यापुरतेच मर्यादित नाही, तर त्यापेक्षा अधिक महत्त्वाचे म्हणजे त्यांनी प्रार्थनेचा सोपा मार्ग सांगितला. समाजाच्या मुक्तीचा नवा मार्ग सांगितला; जो समन्वयवादी होता, सोपा होता आणि समाजाला पुढे घेऊन जाणारा होता.**

**जातिपाँतीं पूछै नहिं कोई। हरी को भजै सो हरिका होई।**

**इतका सोपा धर्म कबीरांनी सांगितला. माणसाचे मोठेपण कर्माने ठरते, त्याच्या जन्माने नाही, हे महत्त्वाचे तत्त्व सांगत माणसाला माणूस म्हणून जगण्याचा समान हक्क प्रस्थापित करण्याचा मार्ग दाखवला.** ■ ■

अभ्यासायला हवे. ते म्हणतात,

*'सरगम लोकमें क्या दुख पडिया तुम आई कलिमाही।*
*जाति जुलाहा नाम कबीरा अजहु पती जौ नाही।*
*तहाँ जाऊ जहाँ पाट-परेबर अगर चंदन घसी लिना।*
*आर हमारी कहा करोगी हम तौ जाति कमिना।*

(क.ग्रं.पद, ३७०)

भारतातील अनेक संतांप्रमाणेच कबीरांच्या बाबतीतही अनेक गूढ गोष्टी अनुत्तरीत आहेत. ते मुस्लिम होते का? जन्माने मुस्लिम होते की, केवळ मुस्लिम मात्या-पित्याने त्यांचे पोलनपोषण केले? असे काही अनुत्तरीत प्रश्न आहेत.

***जोगी गोरख गोरख करै।***
***हिंदू राम नाम उच्चरै।***
***मुसलमान कहे एक खुदाई ।***
***कबीर को स्वामी घटि घटि रहयो समाई।।***

या दोह्यातील 'योगी' हा शब्द नवेच प्रश्न निर्माण करतो. हिंदू आणि मुसलमानांच्या जोडीने कबीर जोगी-योगी असा वेगळा उल्लेख का करतात? जोगी हा त्या काळात वेगळा धर्म तर नव्हता? वेद, ब्राह्मण आणि पौराणिक मत मानणारा तो हिंदू, मग जोगी हिंदू नव्हते का? तर बहुधा ते आश्रम भ्रष्ट होऊन वर्णाश्रमाच्या बाहेर गेलेले समाजगट असावेत. या जोगींचा संबंध नाथपंथाशी आहे आणि कबीरांच्या वंशातही हे नाथपंथी संस्कार दिसतात. नाथपंथ आणि त्यांचे संस्कार माहीत नसतील, तर कबीरांची कविता समजणे अवघड होते. अनेक अभ्यासकांनी ही गफलत केलीच आहे, असे दिसते.

***हिंदू पूजै देहरा मुसलमान मसीद।***
***नामा सोई सेविया जहाँ देहरा न मसीद।।***

असा नामदेवाचा उल्लेख कबीरांनी केला आहे. कबीरांच्या वाणीतून आपल्याकडील भक्ती संप्रदास, सूफी संप्रदाय आणि इतर अनेक गोष्टींचा समन्वय झाल्याचे दिसते. त्यातूनच त्यांची निर्गुण भक्तीची एक परंपरा निर्माण झाली आहे, असेही दिसते. वेगवेगळ्या परंपरांच्या प्रभावातून कबीरांनी आपला विचार सिद्ध केला, असे असले तरी ते कोणताही विचार आंधळेपणाने स्वीकारत नाहीत. त्यांच्या प्रत्येक वाक्याला स्वयंप्रत्यय असल्याचे दिसते. म्हणूनच असं म्हणतात, की 'कबीर की साधना माननेसे नही जाननेसे शुरू होती है।'

गुरूंच्या आज्ञेने त्यांना रामनामाची दीक्षा मिळाली असे मानले जात असले तरी कबीरांचे गुरू रामानंद (इ.१२९०-१४१०) हे त्यांनी मानलेले गुरू आहेत. एकलव्याने जसे द्रोणाचार्यांना गुरू मानून आपली साधना केली होती, तशीच साधना कबीरांनीही केली.

कबीरांनी राम नामाचा महिमा गायला; पण त्यांचा राम निर्गुण आहे. त्यांना रूपापेक्षा नाम महत्त्वाचे वाटते. भक्तिसंप्रदायांमध्ये नाममाहात्म्य नेहमीच प्रमाण मानले गेले आहे. कबीरांनीही 'नाम रूप से बढकर है' या सामान्य सिद्धांताचा अत्यंत क्रांतिकारक असा उपयोग केला. सामान्य माणसांच्या मनातील पारंपरिक, पुराणमतवादी, सगुण रामाला मुक्त करत सामान्यांच्या पातळीवर आणून ठेवले. त्याचे देवत्व मनुपत्वात रूपांतरीत करून टाकले. शास्त्रांमध्ये रंगवलेल्या अवतारी पुरुष, सगुण, वर्णव्यवस्थेचा पुरस्कर्ता, वेदाभिमानी, स्थितीवादी, रामापेक्षा वेगळा निर्गुण राम कबीरांच्या वाणीतून निर्माण झाला.

*'निर्गुण राम जपहू रे भाई'*

असे म्हणणाऱ्या कबीरांना अपेक्षित असलेले 'निर्गुणत्व' पारंपरिक अर्थापेक्षा वेगळे आहे. कुठल्याही नाम-रूप-गुण आणि काळाच्या पलीकडचा, ज्याला कशातच बद्ध करता येत नाही, जो सगळ्या सीमांच्या पलीकडचा आहे, असा रमता राम त्यांना अपेक्षित होता. त्यांच्या मनात रामाच्या अनेकविध प्रतिमा होत्या. अनेक रूपं होती. कधी ते रामाकडे प्रेयसीच्या व्याकूळ नजरेने पाहतात, तर कधी दासाच्या विनम्र भावातून. कधी स्वतःला रामाचा पुत्र समजून त्याच्या ठायी वात्सल्यमूर्ती आईला शोधण्याचा प्रयत्न करतात. प्रेम मिळविण्याच्या अनेकानेक शक्यतांचा, रूपांचा शोध त्यांच्या काव्यातून प्रकट होतो.

कबीरांच्या भक्तीतील हे प्रेम नेमके कोणत्या प्रभावातून आले असावे या विषयी वेगवेगळी मतमतांतरे आहेत. काही अभ्यासकांना हा सूफी संप्रदायाचा प्रभाव आहे, असे वाटते, तर काहींना ते मधुरा भक्तीचेच रूप वाटते; परंतु कबीरांवरील नामदेवांचा प्रभाव पाहता आपल्याकडील वारकरी संप्रदायातील भक्त आणि विठोबा यांच्यातील विविध रूपभक्तीचाच तो आविष्कार असल्यासारखे वाटते. आपल्याकडेही संतांनी विठोबाला विविध रूपांत कल्पिले आहे. आईचे रूप देऊन विठू माऊली, तर आपल्याला परिचित आहे.



कबीरांच्या वाणीतून भक्ती म्हणजे काय हे पाहिले असता वारकरी संप्रदायाचा त्यांच्यावर असलेला प्रभावच सिद्ध होतो. पूजा, अर्चा, विधी, विधानापेक्षा मनातला भाव भक्तीत महत्त्वाचा असतो.

*जप-तप-पूजा-अर्चा जोतिग जग बौराना।*
*कागद लिखी लिखी जगत भुलाना मन ही मन न समाना।।*

(भक्ती आतून, मनातून असली पाहिजे. वरवर जप-तप आणि पूजापाठ करून काही उपयोग नाही.)

*जों पिंड मे है वही ब्रह्मांड मे है।*
*जैसे बहु कंचन के भूषन ये कहि गालि तवा वहिंगे।*
*ऐसे हम लोक वेद के बिघूरे सुन्निहि मौही समाहिंगे।।*

*सुखिया सब संसार है, खावै अरू सोवै।*
*दुखिया दास कबीर है, जागै अरू रोवै।।*

ज्यांना माया कळत नाही ते आनंदात राहतात, मस्त खातात आणि झोपतात. त्यांच्या या अज्ञानामुळेच कबीर मात्र दुःखी आहेत कारण त्यांना जगाची चिंता आहे. जगाच्या कल्याणासाठीच ते जागरणही करतात आणि रूदनही.

पण ही माया मोठी अवघड गोष्ट आहे. तिचा त्याग वाटतो तेवढा सोपा नाही.

*मीठी मीठी माया तजी न जाई*
*अग्यानी पुरिष को भोलि भोलि खाई*

माया म्हणजे स्वार्थ, विषयवासना. माया म्हणजेच




**“माया म्हणजे स्वार्थ, विषयवासना. माया म्हणजेच माणसाचे सहा शत्रू. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर. जे मानवाच्या अधःपतनाला कारणीभूत ठरतात. कबीरांच्या मते पाखंडीपण हे मायेचेच एक रूप आहे. कर्मकांड हीदेखील एक मायाच आहे. जोपर्यंत आपण धार्मिक कर्मकांडापासून मुक्त होत नाही, तोपर्यंत मानवाचे भले होणार नाही आणि मानवाचे भले कुठल्याही बाह्य जगतातून नाही, तर त्याला स्वतःला होणाऱ्या आत्मज्ञानातूनच होणे शक्य आहे. कबीरांनी आत्म्याच्या स्वच्छ रूपाच्या दर्शनासाठी आरशाची प्रतिमा वापरली आहे.**
**जौ दरसन देखा चाहिए, तौ दरपन मंजत रहिए।**
**जब दरपन लागै काई, तब दरसन किया न जाई।। ”**


वेदांतील कनककुंडल न्यायाप्रमाणे सोन्याच्या बांगड्या तयार होतात. त्याच बांगड्या मोडल्या आणि पिघळून टाकल्या तरी सोनं सोनंच राहतं.

*जल मै कुंभ कुंभ मै जल है बाहरी भीतरि पानी।*
*फूटा कुंभ जल जलही समाना, यह तत कथौ गियानी।।*

जगातील दिसणारी भौतिक सुखं म्हणजे केवळ माया आहे. आपण ज्याला आनंद समजतो प्रत्यक्षात तेच दुःख आहे. आपण मायाजालात सापडल्याने ते दुःखच आपल्याला आनंददायी वाटते. प्रत्यक्षात ते आपले अज्ञान असते. ज्याप्रमाणे गौतम बुद्धाने दुःखाचे स्वरूप मांडून दाखविले त्याप्रमाणे कबीरही दुःखाचा एक सिद्धांत मांडतात. ते म्हणतात,

*दुनियाँ भांडा दुःख का भरी मुहाँमुँह मुष।*
*अदया अल्लाह राम की कुर है अनकी कूष।।*

मायारूपी अज्ञानातून बाहेर पडल्याशिवाय खऱ्या सुखाचे स्वरूप कळणार नाही. म्हणूनच ते म्हणतात,

माणसाचे सहा शत्रू. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर. जे मानवाच्या अधःपतनाला कारणीभूत ठरतात. कबीरांच्या मते पाखंडीपण हे मायेचेच एक रूप आहे. कर्मकांड हीदेखील एक मायाच आहे. जोपर्यंत आपण धार्मिक कर्मकांडापासून मुक्त होत नाही, तोपर्यंत मानवाचे भले होणार नाही आणि मानवाचे भले कुठल्याही बाह्य जगतातून नाही, तर त्याला स्वतःला होणाऱ्या आत्मज्ञानातूनच होणे शक्य आहे. कबीरांनी आत्म्याच्या स्वच्छ रूपाच्या दर्शनासाठी आरशाची प्रतिमा वापरली आहे.

*जौ दरसन देखा चाहिए, तौ दरपन मंजत रहिए।*
*जब दरपन लागै काई, तब दरसन किया न जाई।।*

आपल्याला आरशात स्वतःचे प्रतिबिंब पाहायचे असेल, तर आरसा स्वच्छ असावा लागतो. आरसा घाण असेल, त्याच्यावर धुळीची पुटं बसली असतील, काजळी आली असेल, तर आपल्याला 'स्वरूप' कसे दिसेल? त्यासाठी मनाचा आरसा स्वच्छ असायला हवा. मनावर



असलेले मळभ दूर करणे म्हणजेच मायेचा त्याग करणे आणि त्यासाठी सर्वोत्तम पर्याय म्हणजे हरीभक्तीत तल्लीन होणे, भक्तीमध्येच माया नष्ट करण्याची ताकद आहे आणि ज्ञानप्राप्तीचीही. ज्ञानप्राप्तीतूनच आपपर भावाचाही नाश होतो.

*उचित चेति च्यंति लै ताही । जा च्यंत आपा पर नाही*
*हरि हिरदै एक ग्यान उपाया । ता थै छुट गयी सब माया।।*

कबीरांच्या एकूण मांडणीमध्ये ब्रह्मजिज्ञासा, वैष्णवांची सगुणभक्तीतील विशिष्ट तत्त्वांमधून स्वतःच्या निर्गुण भक्तीचे स्वतंत्र रूप सिद्ध केले आहे. कवीरांची भक्ती म्हणजे वैष्णवांचे तात्त्विक सिद्धांत आणि व्यावहारिक भक्तीचे अप्रतिम मिश्रण आहे. सिद्धांत आणि व्यवहार यांची योग्य ती सांगड घालण्याचा प्रयत्न कबीरांनी केला आहे. सिद्धांत आणि व्यवहार एकच असला पाहिजे हा त्याचा प्रमुख आग्रह होता. आपण विचारांतून जे मांडतो ते प्रत्यक्ष व्यवहारात असले पाहिजे. वैष्णव भक्ती आणि निर्गुण भक्ती यांची सांगड घालताना त्यांच्यावर इस्लामच्या एकेश्वरवादाचाही प्रभाव दिसतो.

ज्ञानमार्गाप्रमाणे निर्गुण-निराकार ब्रह्म हा गूढ गहन चिंतनाचा विषय आहे. त्या चिंतनात एक प्रकारची तर्ककठोरता आहे; पण कबीरांनी त्या चर्चेला प्रेमाचे रूप दिले. पारमार्थिक आणि ऐहिक प्रेमाचा भाव प्रकट केला. प्रेम म्हणजेच प्राणिमात्रांविषयी वाटणारा दयाभाव, हे ठासून सांगितले. या दयेचा भाव म्हणजे सर्व मानवजातीविषयी एकच प्रेमभाव असणे. उच्च-नीच, जातिभेद, धर्मा-धर्मातील श्रेष्ठ-कनिष्ठ असा वाद आणि कुठल्याही प्रकारचा भेदभाव यांच्या पलीकडे जाऊन माणसाकडे माणूस म्हणून पाहणे होते.

*एक बूंद एक मलमूत्र एम चाम एक गुदा।*
*एक जाति थै सब उपजा कौन ब्राह्मण कौन सुदा।*

सगळी माणसे सारखीच असतात. त्यांच्यात निसर्गाने भेदभाव केलेला नाही. मग आपणच भेद का मानायचा? म्हणून कबीर जातिभेद आणि धर्मभेदांच्या पलीकडे जाण्याचा प्रयत्न करतात. माणसामाणसांमध्ये केवळ प्रेमाचं, निखळ प्रेमाचं नातं असलं पाहिजे.

*कबीर यहु घर प्रेम का, खालां का घर नाही।*
*सीस उतारै हाथि करै, सो पैसे घर मोही।।*

प्रेमाचे घर म्हणजे काही मावशीचं घर नाही की, तेथे पोहोचल्यावर तुमचं आगत-स्वागत होईल, आदरातिथ्य होईल. या प्रेमाच्या घरात त्यांनाच प्रवेश मिळतो, जे आपले प्राण हातावर घेऊन चालते. अर्थात, येथे सर्वस्व त्यागाची अपेक्षा कबीरांनी व्यक्त केली आहे. कवीरांनी वाणीतील हे प्रेमतत्त्व सूफी संतांच्या सत्संगातून किंवा प्रभावातून आले आहे, हे स्पष्टच दिसत असले तरी सूफींच्या प्रेमाचे तत्त्व आणि कबीर मांडत असलेले प्रेमतत्त्व यात भेद आहे; तो अर्थातच भारतीय परंपरेचा. सूफी संत परंपरेमध्ये परमात्म्याला प्रेयसीच्या रूपात पाहिले जाते. त्यांच्या मजनूला अल्ला लैलेच्या रूपात दिसतो; पण कबीरांच्या बाबतीत तसे नाही. त्यांची प्रेमभक्ती सूफींपेक्षा मधुराभक्तीच्या जवळ जाणारी आहे. सूफी परंपरेत विरहव्यथा किंवा वेदना पुरुषांच्या वाट्याला येताना दिसते. उलट हिंदू परंपरेत ती स्त्रियांच्याच वाटेला जास्त येते. सूफींच्या परंपरेत प्रेयसीच्या प्राप्तीसाठी प्रियकर व्याकूळ होताना दिसतो, तर हिंदू परंपरेत व्याकूळता प्रेयसीच्या वाट्याला येते. मग ती कधी पार्वतीच्या वाट्याला येऊन तिला अपर्णा व्हावे लागते, तर कधी उर्मिलेच्या वाटेला येते, तर कधी मीरेच्या रूपात विष प्यायला लावते. थोडक्यात, सूफी परंपरेतला उपासक स्वतःला पुरुषतत्त्वातच पाहतो, तर हिंदूपरंपरेत स्त्रीरूपात. कबीरांचे प्रेमतत्त्व दोन्हींचा समन्वय साधताना दिसते. कवीरांना कुठल्याही देखाव्यापेक्षा प्रेमाचे अद्वैत अपेक्षित असावे. त्याला कृत्रिम प्रेम अपेक्षितच नाही. मुळात प्रेमात कुठलाच देखावा करण्याची आवश्यकता नसते. तो प्रेमभाव मनातच विद्यमान असावा लागतो. म्हणूनच ते म्हणतात की,

*प्रियतम को पतिया लिखू, जो कही हो विदेस।*
*तन में, मन मे, नैन मे, ताकौ कहां संदेस।।*

●

**प्रा. डॉ. भास्कर ढोके**
नाशिक
मोबाइल : ९४२३०८१०४६



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका










श्रद्धांजली

डॉ. अविनाश सांगोलेकर

# डॉ. सु. रा. चुनेकर

## व्रतस्थ समीक्षक - संशोधक

डॉ. सु. रा. चुनेकर यांचे नुकतेच निधन झाले. त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा आढावा घेणारा श्रद्धांजलीपर लेख!



प्रिल २०१९ ह्या एका महिन्यात मराठी समीक्षा - संशोधनक्षेत्र डॉ. सु. रा. चुनेकर आणि डॉ. गो. मा. पवार ह्या दोन ऋषितुल्य समीक्षक - संशोधकांना कायमचं मुकलं. दोघांनीही वयाची ८० वी ओलांडलेली होती. दोघांशीही माझा अगदी काल-परवापर्यंत संबंध आणि संपर्क होता. डॉ. सु. रा. चुनेकर हे तर माझे थेट गुरुवर्यच होते. ते माझ्या पीएच.डी.चे मार्गदर्शक होते.

झालं असं होतं की, मी डॉ. भालचंद्र फडके ह्यांच्या मार्गदर्शनाखाली 'मराठी गझल : उगम आणि विकास (प्रारंभ ते १९२०)' ही प्रबंधिका सिद्ध करून तेव्हाच्या पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागातून १९८४ मध्ये एम.फिल. ही संशोधनपदवी प्राप्त केलेली होती आणि त्यानंतर लगेचच मला '१९२० ते १९८५ मधील मराठी गझल' हा विषय घेऊन पीएच.डी.साठी रीतसर नावनोंदणी करायची होती. मात्र माझे एम.फिल.चे मार्गदर्शक फडकेसर हे विद्यापीठ सेवेतून नुकतेच निवृत्त झाले होते आणि माझ्यापुढं प्रश्न निर्माण झाला होता की, आता पीएच.डी.कुणाच्या मार्गदर्शनाखाली करायची? मात्र ह्याच सुमारास चुनेकरसर हे संगमनेर महाविद्यालयातली दहा-अकरा वर्षांची प्राध्यापकी सोडून विद्यापीठातल्या मराठी विभागात 'प्रपाठक' ह्या पदावर रुजू झाले आणि माझा प्रश्नही आपोआपच सुटला कारण सर हे एक महत्त्वाचे मराठी गझलकार माधव जूलियन ह्यांचे गाढे अभ्यासक म्हणून सर्वदूर सुपरिचित होते. मी सरांना पत्रानं आणि समक्ष भेटून विनंती करताच ती सरांनी मान्य केली होती.

थोडक्यात, चुनेकरसरांच्या प्रत्यक्ष संपर्कात मी आलो १९८४ मध्ये. तेव्हापासून गेल्या ३५ वर्षांमध्ये मी सरांचे अनेक पैलू जवळून पाहिले, अनुभवले. माधव जूलियनांचे समीक्षक-संशोधक, 'मराठी' विषयाचे महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय प्राध्यापक, मुंबईच्या मराठी संशोधन मंडळाचे प्रपाठक आणि उपसंचालक, मराठी संशोधन मंडळाचे मुखपत्र असलेल्या 'मराठी संशोधन पत्रिका' ह्या त्रैमासिकाचे संपादक, सूची आणि कोश ह्या क्षेत्रांमधले व्रतस्थ समीक्षक - संशोधक हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे महत्त्वाचे पैलू होत. मात्र त्यांचा 'सूची आणि कोश ह्या क्षेत्रांमधले व्रतस्थ



समीक्षक - संशोधक' हाच पैलू मला अधिक भावतो. मराठी समीक्षा-संशोधनाच्या क्षेत्रातही त्यांची हीच तर खरी ओळख आहे.

खरं तर समीक्षेच्या आणि संशोधनाच्या क्षेत्रामध्ये सूचिवाङ्मय आणि कोशवाङ्मय हे महत्त्वाची भूमिका बजावत असतं. ते उपलब्ध करून देण्यासंदर्भात डॉ. सु. रा. चुनेकरांनी आयुष्यभर व्रतस्थपणे स्वतःला झोकून दिलेलं दिसतं. त्यांचा जीवनपट ह्या संदर्भात खूप बोलका आहे. १९५८ मध्ये ते तेव्हाच्या पुणे विद्यापीठातून मराठी आणि संस्कृत हे विषय घेऊन एम.ए.ला सर्वप्रथम आले. त्याबद्दल त्यांना तीन पारितोषिकं मिळाली. पुढं प्रा. रा. श्री. जोग ह्यांच्या मार्गदर्शनाखाली 'डॉ. माधवराव पटवर्धन ( माधव जूलियन ) : वाङ्मयदर्शन आणि चिकित्सा' ह्या विषयावर प्रबंध सिद्ध करून १९६३ मध्ये त्यांनी मराठी विषयात पीएच. डी. प्राप्त केली. त्यासाठी त्यांना उत्कृष्ट प्रबंध म्हणून दोन पारितोषिकंही मिळाली. १९६३ ते १९६८ ह्या काळात त्यांनी पुणे विद्यापीठात पोस्ट डॉक्टरोल संशोधन केलं. १९६८ ते १९७३ ह्या काळात ते मुंबईच्या 'मराठी संशोधन मंडळा' त 'रीडर' ह्या पदावर कार्यरत होते.१९७३ ते १९८४ ह्या काळात ते संगमनेर इथल्या महाविद्यालयात मराठी विभागप्रमुख होते, तर १९८४ ते १९९७ ह्या काळात ते पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात 'रीडर' ह्या पदावर कार्यरत होते. पैकी १ डिसें.१९९५ ते ३०एप्रिल १९९७ ह्या काळात ते मराठी विभागप्रमुखही होते. साठीचे झाल्यानं ते मराठी विभागातूनच सेवानिवृत्त झाले.

डॉ. चुनेकरांनी आयुष्यभर लेखन आणि वाचन ह्या गोष्टींनाच स्वतःला वाहून घेतलं होतं. त्यांचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह खूपच मोठा आहे. त्यांचं लेखन मोजकंच जरी असलं, तरी ते वैशिष्ट्यपूर्ण मात्र निश्चितच आहे. हे सगळंच लेखन प्रकाशित आणि संग्रहित झालं आहे, असं मात्र नाही. त्यांच्या प्रकाशित लेखनामध्ये समीक्षाग्रंथ, संपादित ग्रंथ आणि सूचिग्रंथ ह्यांचा प्रामुख्यानं अंतर्भाव होतो. तपशील सांगायचा झाला, तर त्यांच्या नावावर पुढील ५ समीक्षाग्रंथ आढळतात : १. 'माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन' (१९७३), २. 'माधव जूलियन' (१९८०), ३. 'सहा साहित्यकार' (१९८२), ४. 'जयवंत दळवी यांची नाटके : प्रवृत्तिशोध' (१९९५) आणि ५. 'अंतरंग' (१९९६ ). त्यांच्या नावावर पुढील ७ संपादित ग्रंथ आढळतात : १. 'मराठी संशोधन पत्रिके'तून प्रसिद्ध झालेले साहित्य (खंड ४,५,६ आणि ७), २. 'समग्र माधव जूलियन' सहसंपादन (खंड १ आणि २) (१९७७), ३. 'संशोधन : स्वरूप आणि पद्धती' सहसंपादन (१९८३), ४. 'सोनपावले' (जी.एं.चं असंग्रहित, तसंच अप्रकाशित साहित्य', ५. 'जी.एं.ची पत्रे', सहसंपादन, खंड ३ आणि ४ (२००६), ६. 'दिवस तुडवत अंधारात' (जी.एं.चं अनुवादित नाटक) (२०१४), ७. 'वा. अ. भिडे लेखसंग्रह' (२०१९).








अनुक्रमणिका

> समीक्षेच्या आणि संशोधनाच्या क्षेत्रामध्ये सूचिवाङ्मय आणि कोशवाङ्मय हे महत्त्वाची भूमिका बजावत असतं. ते उपलब्ध करून देण्यासंदर्भात डॉ. सु. रा. चुनेकरांनी आयुष्यभर व्रतस्थपणे स्वतःला झोकून दिलेलं दिसतं. त्यांचा जीवनपट ह्या संदर्भात खूप बोलका आहे. १९५८ मध्ये ते तेव्हाच्या पुणे विद्यापीठातून मराठी आणि संस्कृत हे विषय घेऊन एम.ए.ला सर्वप्रथम आले. त्याबद्दल त्यांना तीन पारितोषिकं मिळाली. पुढं प्रा. रा. श्री. जोग ह्यांच्या मार्गदर्शनाखाली 'डॉ. माधवराव पटवर्धन ( माधव जूलियन ) : वाङ्मयदर्शन आणि चिकित्सा' ह्या विषयावर प्रबंध सिद्ध करून १९६३ मध्ये त्यांनी मराठी विषयात पीएच. डी. प्राप्त केली. त्यासाठी त्यांना उत्कृष्ट प्रबंध म्हणून दोन पारितोषिकंही मिळाली. १९६३ ते १९६८ ह्या काळात त्यांनी पुणे विद्यापीठात पोस्ट डॉक्टरोल संशोधन केलं. १९६८ ते १९७३ ह्या काळात ते मुंबईच्या 'मराठी संशोधन मंडळा' त 'रीडर' ह्या पदावर कार्यरत होते.

त्यांच्या नावावर पुढील ४ सूचिग्रंथ आढळतात : १. 'बा. अ. भिडे यांच्या वाङ्मयाची सूची'(१९६९), २. 'प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या वाङ्मयाची सूची' (१९७३ ), ३. 'डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मयसूची ' ( १९८३ ) आणि ४. 'सूचींची सूची ' (१९९५).

डॉ. चुनेकरांनी सूचींसंदर्भात बरंच लेखन केलं असून ते स्वतःच्या स्वतंत्र ग्रंथांमधून आणि इतरांच्या ग्रंथांमधून, तसंच नियतकालिकांमधून विपुल प्रमाणात वाचकांसमोर आलेलं आहे. कोशांसंदर्भातलंही त्यांचं लेखन विपुल असून ते त्यांच्या स्वतःच्या स्वतंत्र ग्रंथांद्वारे वाचकासमोर न येता विविध नियतकालिकांमधून, तसंच इतरांच्या ग्रंथांमधून वाचकांसमोर आलेलं आहे. उदा. १९७६मध्ये प्रकाशित झालेल्या 'मराठी विश्वकोशा'च्या चौथ्या खंडामध्ये त्यांच्या 'कोशवाङ्मय' आणि 'वि.स.खांडेकर' ह्या दोन नोंदी आहेत. म.सा.प.नं १९८१ मध्ये प्रकाशित केलेल्या वसंत स.जोशी संपादित 'भाषा व साहित्य : संशोधन'च्या पहिल्या खंडामध्ये डॉ. चुनेकरांचा 'कोशरचना व मराठी कोशवाङ्मय' हा दीर्घ आणि अभ्यासपूर्ण असा लेख पृ.४४२ ते ४७० वर पाहावयास मिळतो. म.सा.प. प्रकाशित आणि प्रा. गो. म. कुलकर्णी - डॉ. व. दि. कुलकर्णी संपादित 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' (खंड ६) मध्येही त्यांचा 'कोशवाङ्मय' हा तसाच दीर्घ आणि अभ्यासपूर्ण असा लेख पृ.३१६ ते ३४३ वर पाहावयास मिळतो. ११९९ मध्ये प्रकाशित झालेल्या 'मराठी विश्वकोशा'च्या सोळाव्या खंडात त्यांच्या 'देशातील कोशरचनेचा इतिहास' आणि 'मराठी विश्वकोश परंपरा' ह्या दोन नोंदी अनुक्रमे पृ.८७५ ते ८७६ वर आणि पृ.८७९ ते ८८३ वर पाहावयास मिळतात. तसंच २००७ मध्ये प्रकाशित झालेल्या सतराव्या खंडातही त्यांची 'शब्दकोश' ही नोंद पृ.५९९ ते ६०२ वर पाहावयास मिळते.

अशा प्रकारे डॉ. चुनेकरांचा सूचिवाङ्मय आणि कोशवाङ्मय ह्या क्षेत्रांमधला संचार आणि अधिकार हा केवळ संख्यात्मकदृष्ट्याच नाही, तर गुणात्मकदृष्ट्याही निश्चितच मोठा आहे. 'सूचींची सूची' हा तर सूचिशास्त्रातला त्यांचा अनोखाच प्रयोग म्हणावा लागेल. वर्णनात्मक सूची देण्याचा प्रघातही त्यांनीच सुरू केला. महाराष्ट्रातल्या विद्यापीठांमधून 'मराठी' विषयातल्या पीएच. डी. संशोधन पदवीसाठी जे संशोधन झालं वा होत आहे, त्याची त्यांनी तयार केलेली सूची 'मराठी संशोधन पत्रिके'मधून प्रकाशित होत असे. हा प्रघातही त्यांनीच सुरू केला. आता त्याला गेल्या काही वर्षांपासून दिवसेंदिवस चांगलं महत्त्व येत चाललं आहे. शेवटी मी इतकंच म्हणेन की, गुरुवर्य डॉ. सु. रा. चुनेकरांचं सूची आणि कोश ह्या क्षेत्रांमधलं कार्य पुढं नेणं, हीच त्यांना उचित श्रद्धांजली ठरेल .

●

**प्राचार्य डॉ. अविनाश सांगोलेकर,**
भैरवनाथ विज्ञान महाविद्यालय,
खुटबाव, ता.दौंड, जि.पुणे
चलभाष : ९८५०६१३६०२
ई-मेल : sangolekar57@gmail.com



अनुक्रमणिका

श्रद्धांजली

रणधीर शिंदे

# साक्षेपी समीक्षक आणि महर्षी शिंदे यांच्या जीवनकार्याचे अभ्यासक

**डॉ. गो. मा. पवार यांचे नुकतेच निधन झाले. साक्षेपी समीक्षक व महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनकार्याचे व्यासंगी अभ्यासक अशी त्यांची ओळख. त्यांच्या कार्यकर्तृत्वाचा आढावा घेणारा श्रद्धांजलीपर लेख!**

डॉ. गो. मा. पवार सरांचे दि. १६ एपिल रोजी वयाच्या ८७ व्या वर्षी दु:खद निधन झाले. साक्षेपी समीक्षक व महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनकार्याचे व्यासंगी अभ्यासक अशी त्यांची ओळख आहे. भाषासाहित्याचे व्यासंगी प्राध्यापक व विद्यार्थीप्रिय शिक्षक म्हणूनही ते परिचित होते. त्यांचे लेखन हे तिहेरी स्वरूपाचे आहे. सैद्धान्तिक समीक्षा, उपयोजित समीक्षा यांबरोबर महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनकार्यासंबंधी त्यांनी केलेले लेखन मौलिक ठरले आहे. अलीकडील काळात भाषासाहित्याच्या प्राध्यापकाने सामाजिक सुधारणाकाळाविषयी क्वचितच एवढे लेखन केले असावे. तसेच सरांनी वाङ्मयविषयक व शैक्षणिक संस्थांवर आपल्या कार्याचा वेगळा असा ठसा उमटविला. साहित्य अकादमीच्या मराठी भाषा सल्लागार मंडळाचे ते दहा वर्षे समन्वयक होते. तसेच महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ व विद्यापीठ अनुदान आयोग मंडळ व इतरही संस्थांवर त्यांनी आपल्या कामाचा ठसा उमटविला.



'साहित्यमूल्य आणि अभिरुची' (१९९४) या त्यांच्या पहिल्या समीक्षाग्रंथातील लेख हे १९६२ ते १९९० या काळातील आहेत. मराठी समाजाच्या विस्तारलेल्या कक्षा आणि प्रस्थापित वाङ्मयसंस्कृतीच्या एकारलेपणातून त्यांची समीक्षा उद्‌भवली. स्वातंत्र्यानंतर जीवनसंबद्ध वाङ्मय निर्माण होऊ लागले. तसेच मराठी विचारविश्वातूनदेखील सामाजिक विचारांना महत्त्व प्राप्त झाले. गो. मा. पवार सरांचे महाविद्यालयीन व पदव्युत्तर शिक्षण पुण्यात झाले. या काळात त्यांचा














वावर हा समाजशील मित्रांशी, ज्येष्ठांशी होता. या काळात समाज प्रबोधन संस्थेशी त्यांचा संवंध आला. या संस्थेसाठी त्यांनी 'विवेकनिष्ठ जीवनदृष्टी' (१९६६) हे पुस्तक लिहिले. अ.भि.शहा, दि.के.बेडेकर, पन्नालाल सुराणा, वसंत पळशीकर. मे.पुं. रेगे, रा.भा.पाटणकर यांच्याशी त्यांचा संबंध आला. या सामाजिक वातावरणाचा त्यांच्या विचारदृष्टी व समीक्षेवर परिणाम झाला. पवार यांच्या एकंदर समीक्षेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या प्रत्येक लेखात स्वतंत्र विश्लेषक, असा विचार असतो. समीक्षा म्हणजे केवळ वर्णनपर आशय कथन करणारी आस्वादात्मक असते, याला त्यांनी पूर्णतः फाटा दिला. साहित्यस्वरूपाचा अत्यंत काटेकोर, वस्तुनिष्ठ भूमिकेतूनच ते विचार करत. रूपकात्मक कवितेचे आवाहन बुद्धीला असते व बऱ्याच वेळा ते बाहेरून लादलेले असते. त्यामुळे रूपकात्म कवितेतून खराखुरा काव्यात्म अनुभव येत नसतो, असा विचार त्यांनी त्यांच्या पहिल्याच रूपकात्मक कविता (१९६२) या लेखात मांडला.

ऐंशीच्या दशकारंभी त्यांनी 'तुज आहे तुजपाशी' (पु. ल. देशपांडे), 'रायगडाला जेव्हा जाग येते' (वसंत कानेटकर) तसेच 'गारंबीचा बापू', 'ऑक्टोपस' (श्री.ना.पेंडसे) या साहित्यकृतींवर अतिशय परखड आणि मार्मिक लेख लिहिले. या साहित्यकृतींच्या रूढ लोकप्रिय आकलनापेक्षा वेगळे आकलन त्यांनी मांडले. त्यांच्या समीक्षाविचारांत अभिरुची विचाराला केंद्रीय स्थान होते. या साहित्यकृती रंजनपर, परंपरानिष्ठ मूल्यांच्या चौकटी सांभाळणाऱ्या आणि मध्यमवर्गीय अभिरुचीला शरण जाणाऱ्या साहित्यकृती आहेत असा निष्कर्ष त्यांनी मांडला. 'प्रतिष्ठान'मध्ये लिहिलेल्या या नाटकांवरील लेखाचे शीर्षकच मुळात 'नाट्याभास आणि वाचक-प्रेक्षकांच्या अभिरुचीचा अनुनय' असे होते. मानसशास्त्रातील प्रमेयाधारे श्री.ना.पेंडसे यांच्या कादंबऱ्या दिवास्वप्नाच्या स्वरूपाच्या, उच्च मध्यमवर्गीय समूहाच्या कामविकाराचे रंजक चित्रण करणाऱ्या एकसुरी दीर्घकथेच्या स्वरूपाच्या असल्याचे त्यांनी नोंदविले. मराठी वाङ्मयाच्या वाढत्या विस्तारात अभिरुचिसंघर्षाच्या टकरावाचे स्वरूप शोधले. लेखक आणि वाचकपक्ष्यी अभिरुचीचे सामाजिक आयाम शोधले. प्राचीन कवितेपासून ते आजच्या साहित्यातील अभिरुची द्वंद्वांची निरीक्षणे त्यांच्या समीक्षेत आहेत. मराठी लेखकाच्या साहित्याकलनाची मर्यादा आणि वाचकांच्या अभिरुचीचे लेखकांवर होणाऱ्या 'जबरी आक्रमणाविषयी' चा विचार त्यांनी सुस्पष्टपणे मांडला. ग्रामीण आणि नागर, जुने आणि नवे, पारंपरिक आणि आधुनिकता या दृष्टिकोनाधारे त्यांनी वाङ्मयाभिरुचीचा विचार केला. वि.स.खांडेकरांच्या वाङ्मयातील ध्येयवाद, आदर्शवादी भूमिका, भारतीयत्व, लोकप्रिय अलंकरण शैली व वाचकांच्या हृदयाला हात घालण्याच्या सामर्थ्यामुळे वाचकमनाला आवाहन मिळाले अशी खांडेकरी वाङ्मयाच्या लोकप्रियतेची मीमांसा केली.

वाङ्मयीन संस्कृतीतील अभिरुची संघर्षामुळे नव्या लेखकांचे यथार्थ असे आकलन वाचक-समीक्षकांकडून होत नसल्याची रास्त तक्रार गो.मा.पवार नोंदवतात. भाऊ पाध्ये, भालचंद्र नेमाडे यांच्या वाङ्मयाच्या विस्तारलेल्या भानाचे आकलन मराठी वाङ्मयीन संस्कृतीला करता आले नाही. भाऊ पाध्ये यांच्या साहित्यातील नवनैतिकतेचे स्वरूप, मध्यमवर्गीयांचा उथळपणा, अनुत्कट शैली तसेच भालचंद्र नेमाडे यांच्या कादंबऱ्यांतील महाराष्ट्र समाजदर्शन, समूहटीका व बोचणारा उपरोध या बाबींमुळे रूढ अभिरुचीने त्यांच्या वाङ्मयाची दखल घेतली गेली नाही. या आवाहनपरतेमुळे वाचक व समीक्षकांत दुरावा निर्माण झाल्याचे ते सांगतात.

साहित्य आणि सामाजिकता यातील आंतरसंबंधाबद्दल त्यांना विशेष आस्था होती. या दृष्टिकोनाचा त्यांच्या समीक्षेवर मोठा प्रभाव होता. स्वातंत्र्यपूर्व ते स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी वाङ्मयाची पाहणी त्यांनी या दृष्टिकोनाधारे केली. लेखकाची

जडणघडण, त्याचा मनःपिंड, निर्मितीप्रेरणा, भापा व अभिरुचीचा त्यांनी समाजासंदर्भात केलेला विचार महत्त्वाचा आहे. १९६० नंतरचे समाज वदल व विकेंद्रीकरणामुळे मराठी वाङ्मयाच्या कक्षा विस्तारल्या त्यामुळे नव्या अनुभवाच्या वाङ्मयीन गुणवत्तेचे साहित्य आले. याचा त्यांनी पुरस्कार केला. साहित्याचे स्वरूप हे व्यापक भूमिकेवरून समजून घेतले पाहिजे, अशी त्यांची धारणा होती. दलित साहित्यावद्दलच्या सामाजिक, सांस्कृतिक फलश्रुतीबद्दलची त्यांनी रास्त अशी दखल घेतली. मात्र ग्रामीण साहित्य चळवळीला अशी कोणतीही भूमिका नसल्याचे परखडपणे सांगितले. तसेच पुढील टप्प्यावर दलित, ग्रामीण साहित्य एकांगी व्हायला नको, असेही साधार नमूद केले.

चिं.वि.जोशी, व्यंकटेश माडगूळकर, गंगाधर गाडगीळ, चारुता सागर, सिनिक यांच्या कथावाङ्मयावरील त्यांची समीक्षा महत्त्वाची आहे. माडगूळकरांच्या कथावाङ्मयाचा आवाका, त्यांचे मानव व मानवेतर जगाचे आकलन, निसर्ग, प्रदेशाचे भान व देशी जाणिवांची सखोल मीमांसा केली. माडगूळकरांच्या कथेतील दलित विद्रोहात्म जाणिवेचे त्यांनी केलेले निवडक कथा संपादन (ओझं) वैशिष्ट्यपूर्ण ठरले. तसेच चारुता सागरांच्या कथेतील भटक्या विमुक्तांच्या समाजचित्रणामुळे त्यांच्या कथेला मिळालेल्या परिमाणाची गुणवत्ता नमूद केली. आधुनिक मराठी कथासाहित्यातील बदलत्या रूपाची व वाङ्मयीन गुणवत्तेची सखोल चिकित्सा त्यांनी केली. साहित्यस्वरूपाबद्दल सुस्पष्ट भूमिका वाङ्मयाचा जीवनसंबद्ध विचार, वास्तवता, नवी नैतिकता, आधुनिकता या मूल्यांना त्यांच्या समीक्षेत स्थान आहे. साहित्यातील जीवनदर्शनाबरोबरच कलात्मकतेकडेही ते वारंवार लक्ष वेधतात. मराठी लेखकांचे परंपराप्रेम आणि जीवनविन्मुखतेबद्दल त्यांनी सतत खंत व्यक्त केली.

प्रा.गो.मा.पवार यांच्या समीक्षालेखनाचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांची तात्त्विक स्वरूपाची समीक्षा. त्यांनी सुखान्तिकेची संकल्पना नाटकाच्या संदर्भात मांडली. मानवी जीवनेच्छेचा आविष्कार आणि चैतन्यपूर्ण मानवी जीवनाच्या सातत्याची प्रतीती ही सुखात्मिकेची वैशिष्ट्ये सांगून त्याचे प्रकार विशद केले. 'विनोद-तत्त्व आणि स्वरूप' (२००६) या ग्रंथात त्यांनी विनोदात्म वाङ्मयाचा संकल्पनात्मक नकाशा मांडला. प्लेटो, ॲरिस्टॉटल, हॉब्ज, ऑर्थर कोस्लर, बर्गसाँ तसेच भरतमुनी ते न.चिं.केळकर या पाश्चात्त्य व भारतीय साहित्यशास्त्रज्ञांनी मांडलेल्या उपपत्तीआधारे त्यांनी नवा विनोदविषयक सिद्धांत मांडला. व्यंगकल्पना, अभिव्यक्तिवैशिष्ट्ये, क्रीडावृत्ती, हास्यमीमांसा व चैतन्यतत्त्वाशी संबंधित विविध उपपत्ती मांडून विनोदाची संकल्पना मांडली. संकल्पनात्मक लेखनाबरोबरच त्यांची मराठी विनोदी वाङ्मयाची समीक्षा 'मराठी विनोद-

**"प्रा.गो.मा.पवार यांच्या समीक्षालेखनाचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांची तात्त्विक स्वरूपाची समीक्षा. त्यांनी सुखान्तिकेची संकल्पना नाटकाच्या संदर्भात मांडली. मानवी जीवनेच्छेचा आविष्कार आणि चैतन्यपूर्ण मानवी जीवनाच्या सातत्याची प्रतीती ही सुखात्मिकेची वैशिष्ट्ये सांगून त्याचे प्रकार विशद केले. 'विनोद-तत्त्व आणि स्वरूप' (२००६) या ग्रंथात त्यांनी विनोदात्म वाङ्मयाचा संकल्पनात्मक नकाशा मांडला. प्लेटो, ॲरिस्टॉटल, हॉब्ज, ऑर्थर कोस्लर, बर्गसाँ तसेच भरतमुनी ते न.चिं.केळकर या पाश्चात्त्य व भारतीय साहित्यशास्त्रज्ञांनी मांडलेल्या उपपत्तीआधारे त्यांनी नवा विनोदविषयक सिद्धांत मांडला. व्यंगकल्पना, अभिव्यक्तिवैशिष्ट्ये, क्रीडावृत्ती, हास्यमीमांसा व चैतन्यतत्त्वाशी संबंधित विविध उपपत्ती मांडून विनोदाची संकल्पना मांडली."**



विविध आविष्काररूपे' या ग्रंथात समाविष्ट आहे. चक्रधर, तुकारामांच्या विनोदापासून आधुनिक मराठी वाङ्मयातील विनोदी वाङ्मयाची त्यांनी मौलिक अशी समीक्षा केली. विनोदात्म वाङ्मयाचा नकाशा सांगत असताना त्यांनी विविध प्रकारच्या विनोदाची फार सरस अशी उदाहरणे या ग्रंथात ठिकठिकाणी दिली आहेत. जीवनसंबद्ध विनोदाचे स्वरूप विशद केले. विनोदात्म लेखन करणाऱ्या लेखकांच्या स्त्रियांबद्दलच्या अनुदार दृष्टिकोनाची साधार चिकित्सा केली.

लीळाचरित्रातील व तुकारामांच्या जीवनसंबद्ध विनोदात्म वाङ्मयाचा वारसा श्रीपाद कृष्ण कोल्हटकर व चिं.वि.जोशी यांनी चालवला. जीवनाभिमुख व मूल्यनिष्ठ विनोदाचा हा वारसा स्वातंत्र्यानंतर लोप पावल्याचे त्यांनी नमूद केले. राम नगरकरांच्या आत्मकथनाचे एकंदर जीवनदर्शन हे खेळकर, निर्मळ विनोदात्म असल्याचे ते आवर्जून नमूद करतात. अशा प्रकारचे सर्वस्वी विनोदात्म आत्मचरित्रपर पुस्तक मराठीत तरी एकमेवच म्हणावे लागेल. हे त्यांचे निरीक्षण महत्त्वाचे ठरते. गो.मा.पवार यांनी केलेली ही विनोदी वाङ्मयाची संकल्पनात्मक मांडणी केवळ मराठीच नव्हे, तर भारतीय पातळीवरदेखील अपवादभूत अशी आहे. वाङ्मय संस्कृतीत विनोद वाङ्मयस्वरूपाच्या समीक्षेचा आराखडा त्यांनी नव्याने उपलब्ध करून दिला. विनोद वाङ्मयातील असंख्य उदाहरणे, प्रकारभेद, त्याची समाजसंस्कृतिनिष्ठता, रूपतत्त्वे यांतली खूप सूक्ष्मता त्यांच्या लेखनात आहे. रा.भा.पाटणकर (सौंदर्यमीमांसा) व सुधीर रसाळ (कविता आणि प्रतिमा), अशा तत्त्वचर्चाप्रधान ग्रंथ वाटेवरील हा महत्त्वाचा संकल्पनात्मक ग्रंथ आहे. त्यामुळेच त्यांच्या या लेखनामुळे विनोदी वाङ्मयाच्या 'काव्यशास्त्राचे नवे दालन उघडले गेले आहे.' असे डॉ. सुधीर रसाळ यांनी म्हटले ते रास्तच आहे.

महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे जीवनकार्य हा त्यांच्या आयुष्याचा ध्यास होता. सत्तरच्या दशकात ते या संशोधनाकडे वळले. महर्षी शिंदे यांच्या जीवनकार्यासंबंधी अफाट साधने, सामग्री भारतातूनच नव्हे, तर परदेशातून देखील मिळवली. या आधारे महर्षी शिंदे यांच्या कार्यावर जवळपास छोटी-मोठी दहा पुस्तके त्यांनी लिहिली. यापैकी 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे जीवन व कार्य' (२००४) या बृहत चरित्रग्रंथास साहित्य अकादमीच्या पुरस्काराने गौरविण्यात आले. भारतीय समाज सुधारणेच्या इतिहासात दुर्लक्षिलेल्या महर्षींच्या कार्याचा संगतवार व्यापक पट त्यांच्या या संशोधनामुळे उपलब्ध झाला. मराठी चरित्रवाङ्मयाला व विचारविश्वाला समृद्ध करणारा चरित्रग्रंथ सरांनी लिहिला. सरांच्या या कार्याचे निश्चितच भारतीय समाजावर मोठे ऋण राहणार आहेत. महर्षींच्या कार्यावरील या लेखनामुळे समाजसुधारकांबरोबरच साक्षेपी विचारवंत, संशोधक,



**"महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांचे जीवनकार्य हा त्यांच्या आयुष्याचा ध्यास होता. सत्तरच्या दशकात ते या संशोधनाकडे वळले. महर्षी शिंदे यांच्या जीवनकार्यासंबंधी अफाट साधने, सामग्री भारतातूनच नव्हे, तर परदेशातून देखील मिळवली. या आधारे महर्षी शिंदे यांच्या कार्यावर जवळपास छोटी-मोठी दहा पुस्तके त्यांनी लिहिली. यापैकी 'महर्षी विठ्ठल रामजी शिंदे जीवन व कार्य' (२००४) या बृहत चरित्रग्रंथास साहित्य अकादमीच्या पुरस्काराने गौरविण्यात आले. भारतीय समाज सुधारणेच्या इतिहासात दुर्लक्षिलेल्या महर्षींच्या कार्याचा संगतवार व्यापक पट त्यांच्या या संशोधनामुळे उपलब्ध झाला. मराठी चरित्रवाङ्मयाला व विचारविश्वाला समृद्ध करणारा चरित्रग्रंथ सरांनी लिहिला. सरांच्या या कार्याचे निश्चितच भारतीय समाजावर मोठे ऋण राहणार आहेत."**



अनुक्रमणिका

भाषाशास्त्रज्ञ व गुणसंपन्न लेखक म्हणून महर्षींच्या कार्याकडे महाराष्ट्राचे लक्ष वेधले गेले. प्रा. राम बापट यांनी या चरित्राबद्दल म्हटले आहे की, 'महर्षींचे एवढे सविस्तर, सांगोपांग, समतोल, गौरवपर त्याच वेळी तटस्थ आणि अस्सल साधनांवर आधारलेले हे मराठीतले पहिलेच चरित्र आहे. महर्षींच्या कार्याची थोरवी मांडत असताना स्वाभाविकच महर्षींच्या व्यक्तिमत्त्वाचा, अंतरंग-भावदर्शनाचा खोलवरचा ठसा स्वाभाविकपणेच पवार सरांच्या जीवनदृष्टीवर पडला.

सरांचे महाविद्यालयीन व पदव्युत्तर शिक्षण पुण्यात झाले. एस.पी. कॉलेज व पुणे विद्यापीठाविषयी व तेथील शिक्षकांविषयी त्यांच्या मनात कृतज्ञता होती. वेगवेगळ्या कामासाठी पुण्यात सर ज्या ज्या वेळी जात त्या त्या वेळी ते परिषदेच्या अतिथिगृहात थांबत. परिषदेचे ते उपाध्यक्षही होते. विनोदाच्या संकल्पनेवरची त्यांची तीन व्याख्याने साहित्य परिषदेत झाली होती. तसेच या ग्रंथास साहित्य परिषदेचा पुरस्कारही लाभला होता.

सरांचे व्यक्तिविषयक लेखन 'सुहृद आणि संस्मरणे' या लेखसंग्रहात समाविष्ट आहे. सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाला व्यक्तींच्या कार्यामुळे उंची प्राप्त होत असते असे त्यांना वाटे. मानवी संबंधातील हृद्य अनुभवांनी स्वतःला संपन्न केल्याची धन्यता त्यांच्या मनात निरंतर वसत होती. त्यामुळेच वडीलधाऱ्या भगवंतराव देशमुख किंवा वा. ल. कुळकर्णी यांच्यावर जेवढ्या प्रेमभावाने ते लिहितात, तेवढेच आपल्यापेक्षा वयाने लहान असलेल्या रमेश ढावरे या सहकाऱ्यावर 'निरागस अंतःकरणाचा जिव्हाळ्याचा सहकारी' असा लेख लिहितात. भालचंद्र नेमाडे यांच्या साहित्यातील गुणवत्ता आणि सौंदर्यनिर्माणक परिकल्पना सांगण्याबरोबरच नेमाडे यांचे 'रात्रीच्या प्रहरी नीरव शांततेत त्यांचे सर्जनकार्य चालू असते आणि त्याचा त्यांच्या आनंदाचा स्रोत त्यांच्या अंतःकरणात दडलेला असतो', असे सांगतात. त्यांच्या पत्नी सौ.सुजाता (माई) या महर्षींच्या नात, याचा त्यांना फार अभिमान आणि धन्यता वाटे. सुधीर रसाळ यांनी त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे 'नवनीतमृदू आणि वज्रकठोर मित्र' असे केलेले वर्णन सार्थ असेच आहे.

जीवनातील प्रत्येक अवस्था ही आनंददायक असते. तसेच जीवन हे आनंदाने तुडुंब भरलेले आहे, हा अनुभव आपण पूर्ण क्षमतेने घ्यायला पाहिजे व त्यास अनुरूप अशी आपली मनोवृत्ती असली पाहिजे, या भूमिकेतून ते जीवनाकडे पाहत. व्यवसायावरची अपार निष्ठा, अखंड ज्ञानसाधना, मानवी नात्यांनी आलेली समृद्धता त्यांना महत्त्वाची वाटे. बौद्ध तत्त्वज्ञानातील ब्रह्मविहारातील 'मुदिता' (इतरांच्या सुखाने आनंद होणे.) या तत्त्वाचा अखंड ध्यास त्यांच्या मनात वसे.

१९७० नंतरच्या समीक्षा परंपरेत मौलिक अशी समीक्षा प्रा.गो.मा.पवार यांनी केली. तात्त्विक आणि उपयोजित समीक्षापरंपरेत मोलाची भर त्यांच्या समीक्षेने घातली. जीवनसंबद्ध समीक्षाविचार, सामाजिक दृष्टिकोन, वाङ्मयाभिरूचीसंबंधीचा नवा विचार ही त्यांच्या समीक्षेची वैशिष्ट्ये होत. वाङ्मयीन परंपरेचे भान, साहित्यस्वरूपाबद्दल व्यापक भूमिका, सुसंगत आणि सुस्पष्ट विचार ही त्यांच्या लेखनाची वैशिष्ट्ये. त्यांची विनोदी वाङ्मयाची समीक्षा ही नवीन व अपवादभूत ठरते. महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांच्या जीवनकार्याचा वेध हा तर महाराष्ट्राच्या विचारविश्वातला महत्त्वाचा भाग ठरला. साक्षेपी समीक्षक, महर्षी शिंदे यांच्या जीवनकार्याचे अभ्यासक आणि तळमळीच्या विद्यार्थिप्रिय शिक्षकाला महाराष्ट्र मुकला आहे.

●

**रणधीर शिंदे**
मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
इ-मेल : randhirshinde76@gmail.com



अनुक्रमणिका



लेख

मधु जामकर

# तीर्थरूप महाराष्ट्र : नवे आकलन

पंडित महादेवशास्त्र जोशी यांच्या 'तीर्थरूप महाराष्ट्र' या ग्रंथाची सौंदर्यस्थळे उलगडून दाखवणारा लेख.



रतीय संस्कृती कोशाचे संपादक पं. महादेव शास्त्री जोशी (१९०६-१९९२) यांच्या 'तीर्थरूप महाराष्ट्र' या दोन खंडांचे प्रथम प्रकाशन सन १९५१ मध्ये झाले. तत्पूर्वी हे लेख 'प्रसाद' या नियतकालिकातून प्रसिद्ध झाले. आजपर्यंत या ग्रंथाची पाच मुद्रणे झाली असून शेवटचे मुद्रण १९६६ मध्ये झाले आहे. या दोन्ही खंडांमागची भूमिका प्रयोजन पं. महादेव शास्त्री यांनी आपल्या खंडांच्या सुरुवातीला स्वच्छ मांडले आहे. महाराष्ट्राच्या पाठीशी सुमारे तीन हजार वर्षांची परंपरा आहे. यात कित्येक धर्मपंथ आणि उपासना मार्ग यांचा इथे विकास आणि संकोच झाला आहे. त्यात नवे देव आले, नवे आदर्श निर्माण झाले आणि नवी तीर्थेही माहात्म्य पावली. बऱ्या वाईट दोन्ही प्रकारांनी महाराष्ट्राचा इतिहास अद्भुत आहे.

इ.स. १९५७ साली भारतीय कोश या मंडळाची पं. महादेव शास्त्री जोशी यांच्या मुख्य प्रेरणेने स्थापना झाली. याद्वारे त्यांनी महाराष्ट्रीय संस्कृतीविषयक तीर्थक्षेत्रांचे अवलोकन करून त्या आधारे महाराष्ट्र ज्ञानकोशाच्या धर्तीवर भारतीय संस्कृतिकोशाची निर्मिती केली. त्यातून त्यांनी महाराष्ट्रीय संस्कृतीचा व्यापक आणि तपशीलवार विचार केला. त्यांच्या मते आजमितीस महाराष्ट्रीय जनतेत तीर्थक्षेत्रातील संस्कृतीविषयक जिज्ञासा नव्याने उदयास आली आहे. सुशिक्षित, सुसंस्कृत माणसे आपल्या परंपरा आणि आपला तीर्थरूप महाराष्ट्र यांच्या शोधात आहे. समाजाच्या या जिज्ञासेची पूर्ती करणे व तिला अधिक ज्ञानाच्या कामी मार्गदर्शन करणे महत्त्वाचे आहे. या दृष्टीने लेखक तीर्थक्षेत्राकडे नव्याने वळला आहे. पुढे हा लेखक प्रकृती, विकृती आणि संस्कृती यांच्या निकोप विवेचनाकडे वळतो. त्यात प्रकृती म्हणजे निसर्ग, विकृती म्हणजे त्यात होणारा विकार किंवा बिघाड आणि संस्कृती म्हणजे हा बिघाड होऊ नये म्हणून तिच्यावर करायचे विविध असे सम्यक् संस्कार होत. संस्कृती ही एका व्यक्तीची नसून ती समाजाची असते. आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक अशी तीन अंगे या संस्कृतीची असतात.




त्यांनी घडविलेल्या तीर्थयात्रेत या तिन्ही अंगांची सरमिसळ दिसून येते. या यात्रेचा उद्देशच मुळी आपले भाग्य अनुकूल व्हावे, त्यातील प्रयत्न सफल व्हावे आणि संकटे निरस्त्र व्हावीत, या उद्देशाने देवांची पूजा आणि प्रार्थना करणे.



अनुक्रमणिका

या सर्व तीर्थांतील सामंजस्य आणि एकात्मता यातून महाराष्ट्राच्या संस्कृतीचे नवे उन्मेष दिसतात. पुन्हा त्यातील उपासनेच्या आविष्काराच्या विविध पद्धतीही दिसून येतात. धर्म, पंथ, आचार, विचार, श्रद्धा संकेत, पूजास्थाने, देवता, यात्रा, उत्सव, व्रते साहित्य आणि चालीरीती यांचे रूपही दिसून येते. या लेखकाला या विविध दर्शनांत एकात्मतेची अनुभूती प्राप्त होते व त्याबरोबर आपणही विविधतेत एकात्मतेचे दर्शन पाहतो. नामरूपाच्या या दर्शनात नामरूपातीत शाश्वत तत्त्वाचा शोधही आपणास घडतो. त्यात भिन्न प्रदेश व धर्माच्या आणि भिन्न पंथाच्या विकसित झालेल्या संस्कृतीचा महाराष्ट्राचे सम्यक दर्शन घडविले जाते. तीर्थक्षेत्राचा संपूर्ण पौराणिक व राजकीय इतिहास येथे पाहण्यास मिळतो. तसेच देव-देवतांचे चरित्रकार्य आणि साहित्य यांचे प्रभावी दर्शनही घडते.

त्यातून विश्वांतर्गत दैवी शक्तीचे साहाय्य प्राप्त करून घेणे हा आहे. स्वतःच्या मनबुद्धीवर संस्कार करून त्यांना आत्मदर्शनाची योग्यता प्राप्त करून देणे या आध्यात्मिक उद्देशाने ते महाराष्ट्राचे तीर्थरूप दर्शन घडवितात. यातून सर्व अंगांनी अंतर्नाट्य विकसित झालेले मानव्य ते दाखवितात. त्यांच्या या यात्रेत व्यक्तित्व आणि मानव्य यांचे एकात्म झालेले रूप पानोपानी दिसून येते. लेखकाने लौकिक अभ्युदयाची साधना करता करताच निश्चयाची सिद्धी प्राप्त करून आधिभौतिक आणि आधिदैविक यांचा मान करीत आपल्या आध्यात्मिक मूल्यांची प्रतिष्ठापना केली आहे. तो या संपूर्ण यात्रेत केवळ तीर्थे पाहत नाही, त्यातील मूर्तीचे देव दर्शन घेत नाही की, निसर्गदर्शनाने तृप्त होत नाही, तर तो आपल्या परंपरेचा नवतेसह, कर्मयात्रेसह जिव्हाळा निर्माण व्हावा म्हणून भक्तीचा आधार घेतो आणि कर्मात उत्साहाचा झरा सतत वाहता राहावा म्हणून कला निर्मितीला, आपल्या लेखन कृतीला, मान्यता देतो. त्यासाठी तो संत, महंत, विविध धर्मसंप्रदाय, तत्त्वज्ञानी आणि चारित्र्यवान विभूतींचा सन्मान करीत, आतून त्यांचे अपूर्व स्मरण आपणास करावयास सांगतो. ही तीर्थयात्रा केवळ ऐहिक उत्कर्षावर संतुष्ट होत नाही, तर तिचे अंतिम ध्येय आध्यात्मिक विषयाचे नवे आकलन, ऐतिहासिक व पौराणिक संदर्भाचे नवे दर्शन आंतर्बाह्य रूपाने घडवते. या सर्व तीर्थांतील सामंजस्य आणि एकात्मता यातून महाराष्ट्राच्या संस्कृतीचे नवे उन्मेष दिसतात. पुन्हा त्यातील उपासनेच्या आविष्काराच्या विविध पद्धतीही दिसून येतात. धर्म, पंथ, आचार, विचार, श्रद्धा संकेत, पूजास्थाने, देवता, यात्रा, उत्सव, व्रते साहित्य आणि चालीरीती यांचे रूपही दिसून येते. या लेखकाला या विविध दर्शनांत एकात्मतेची अनुभूती प्राप्त होते व त्याबरोबर आपणही विविधतेत एकात्मतेचे दर्शन पाहतो. नामरूपाच्या या दर्शनात नामरूपातीत शाश्वत तत्त्वाचा शोधही आपणास घडतो. त्यात भिन्न प्रदेश व धर्माच्या आणि भिन्न पंथाच्या विकसित झालेल्या संस्कृतीचा महाराष्ट्राचे सम्यक दर्शन घडविले जाते. तीर्थक्षेत्राचा संपूर्ण पौराणिक व राजकीय इतिहास येथे पाहण्यास मिळतो. तसेच देव देवतांचे चरित्रकार्य आणि साहित्य यांचे प्रभावी दर्शनही घडते.

पं. महादेव शास्त्री यांचे घराणे संस्कृतीत मुरलेल्या पुराणिकांचे, वेदशास्त्रसंपन्न विद्याभ्यासाचे आहे.



महाराष्ट्रातील तीर्थांची माहिती शुद्ध सोप्या आणि रसवादी भाषेत शास्त्रीबुवा सांगतात. नदीच्या विशाल पात्रातील वाहत्या पाण्याप्रमाणे तीर्थक्षेत्रांसंबंधीचे ज्ञान व त्यातील भक्तिजल वाचकांसाठी सदैव ताजे, पवित्र आणि मनोरंजक असे ज्ञानभक्तितीर्थयुक्त झाले आहे. शास्त्रीबुवांच्या लेखणीतून उतरलेली ही तीर्थक्षेत्रे दोन खंडांत वाचकांपुढे प्रकट होतात. पहिल्या खंडात नऊ व दुसऱ्या खंडात नऊ अशी त्यांची विभागणी आहे. एकूण अठरा तीर्थक्षेत्रे जणू काय वाचकांसाठी अठरा पर्वे किंवा गीतेचे अठरा पवित्र अध्याय वाटतात. त्यात तीर्थरूप महाराष्ट्राची स्थळवर्णने, प्रवासवर्णने यांचा वाचकांसाठीचा रसपूर्ण अनुभव मनोरंजनयुक्त झाला आहे. ही वर्णने इतरांना आजच्या परिस्थितीत नव्या आकलनातून कळतात. शास्त्रीबुवा त्या स्थळाचे पुराणातले आधार देऊन त्याचे माहात्म्य तर प्रतिपादन करतातच, त्याचबरोबर त्यातील तारतम्यही निदर्शनास आणून देतात. त्या क्षेत्राचे, तीर्थाचे दिव्यत्व प्रतीत व्हावे हे प्रयोजन त्यांच्या या निवेदनामागे असते. हे तीर्थक्षेत्र अनुभवण्यासाठी सश्रद्धता व रसिकता तसेच जिज्ञासूवृत्ती एकात्म करून पाहता आली पाहिजे. त्यात केवळ देऊळ दर्शन किंवा मूर्तीदर्शन महत्त्वाचे नसून त्यामागे उभा असलेला इतिहास व त्या दैवत संप्रदायाचा आपल्यावर काय प्रभाव पडला आहे, त्या देवळाचे शिल्पसौंदर्य कोणत्या जातीचे व काळाचे आहे, हेही त्यांच्या तीर्थनिवेदनातून कळते. तसेच या तीर्थाविषयी महाराष्ट्राच्या लोकगीतांतून त्याचे कसे काय दर्शन मिळते हेही या तीर्थप्रवासाच्या निमित्ताने वाचकाच्या लक्षात येते.

शास्त्रीबुवांच्या मते तीर्थ आणि देव यांना विशाल अर्थ आहे. तीर्थ म्हणजे केवळ पाणी नव्हे, तसेच पाषाण मूर्ती म्हणजे केवळ देव नव्हे, तर आपल्या पूर्वजांनी जिथे तप करून वास्तव्य करून कर्म, भक्ती, ज्ञान यांच्या उपासनेतून या तीर्थाकडे पाहिले, ती सर्व पावनतीर्थे त्यातील उपास्य देवतेसह आमची संस्कृती बनून राहिली आहेत. तो या महाराष्ट्रातील तीर्थक्षेत्रांकडे उत्तुंग सह्याद्रीप्रमाणे पाहतो, त्यातल्या सागरतीर्थाचे गांभीर्य लक्षात घेतो. त्यातील कृष्णा, गोदा, भीमा या नद्यांच्या पवित्र प्रवाहातून रसमय झालेला प्रदेश आपण पाहतो. या सर्वांच्या काठी वसलेली ही देवता क्षेत्रे, अवतार क्षेत्रे आणि संत क्षेत्रे आपल्या अवलोकनात घट्ट बसलेली पावन क्षेत्रे आहेत. असा हा तीर्थरूप महाराष्ट्र पाहताना डोळ्यांचे पारणे फिटते. या सर्व क्षेत्रांभोवती जमा झालेला संप्रदायाचा इतिहास आणि त्या पावनभूमीत आपल्या नजरेतून घडलेले दर्शन यात भक्ती आणि ज्ञान संपन्नता दिसून येईल. आपला महाराष्ट्र तीर्थक्षेत्राबाबत असामान्य आहे. त्यातील करवीर आणि नाशिक-त्र्यंबकेश्वर ही पुराणक्षेत्रे प्रांतीयतेच्या सीमा ओलांडून भारतीय झालेली आहेत. किंबहुना साऱ्याच तीर्थक्षेत्रांविषयी असे म्हणता येईल. महाराष्ट्रातील पाच ज्योतिर्लिंगे महाराष्ट्राचे भक्तिवैभव आहे. अष्टविनायक मंदिरे आपल्या श्रद्धेतून जगण्याला संजीवनी देतात. आपले नाथ, वारकरी, दत्त आणि समर्थ संप्रदाय केवळ शोभेची प्रवास यात्रा नसून त्यातील उपासना ही भक्ती-ज्ञान-कर्म या त्रिवेणी संगमाची भूमी आहे. ही तीर्थे शिव, विष्णू, देवी आणि गणपती अशा प्रमुख दैवतांची केंद्रे आहेत. आपण जेव्हा ही तीर्थक्षेत्रे वाचनातून अनुभवतो, तेव्हा या लेखकाबरोबर आपणही वाङ्मयपूजा करतो. लेखकाची भाषा आपल्या पवित्र कल्पनेला नवे नवे उन्मेष दाखवून देते.

लेखक जेव्हा आळंदीच्या ज्ञानेश्वरांचे वर्णन 'रातोत्पलासारखी पावले' या क्षेत्रावर उमटली आहेत असे करतात तेव्हा कल्पना, भावना आणि विचार यांनी एकत्र झालेली प्रतिभा आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते. आळंदी क्षेत्रातील लेखकाचे आगमन नाविन्यपूर्ण आहे. लेखक आळंदीत जेव्हा पोचतो, तो म. गांधींच्या रक्षा विसर्जनाचा दिवस असतो. एवढेच नव्हे, तर भाग्यवशात या रक्षाविसर्जन विधीचे धार्मिक पौरोहित्य त्याच्याकडे आलेले असते. ''इंद्रायणीच्या तळातून महात्माजींची आत्मज्योत ज्ञानेश्वरांच्या समाधीस्थानात प्रवेशते आहे आणि चिरा न हलवता, दार न उघडता ज्ञानेश्वरांची निष्कंप आत्मज्योत म. गांधींच्या नव्या ज्योतीच्या स्वागतासाठी समोर झोक देत आहे. या दोन्ही ज्योतींमधले अंतर हळूहळू कमी होत या दोन ज्योती एकमेकींच्या हृदयात आपले प्रतिबिंब पाहत आहेत.



अनुक्रमणिका

"एखाद्या अभिजात कलाकृतीचा सविकल्प समाधीने आस्वाद घ्यावा तसा लेखक या आळंदींच नव्हे, इतरही क्षेत्रांचा आस्वादपूर्ण अनुभव व्यक्त करतो. देहू या संत तुकाराम नगरीत त्याला 'देहूला पाहाण्याजोगे फार थोडे आहे; पण चिंतनाजोगे पुष्कळ आहे', अशी अनुभूती मिळते. नाथांच्या पैठणमध्ये 'जनता हाच जनार्दन आणि जनसेवा हीच भक्ती' अशी शुद्ध भावना उजळून निघते. संतांची तीर्थक्षेत्रे दर्शन घेण्यासाठी, त्यातील वर्णन करण्यासाठी नसतात. ती पुनःप्रत्ययातून तुम्हाला वारंवार चिंतनप्रिय झालेली असतात. लेखकाने सर्व पवित्र संतक्षेत्रे आपल्या वर्णनशैलीने तुमच्या-आमच्यासाठी पावन केली आहेत. ही संतक्षेत्रे दर्शनासाठी आसुसलेली नाहीत. त्यामागील आंधळ्या दंतकथेने, आंधळ्या चमत्काराने डागलेली नाहीत. या साऱ्यांना लेखकाची शैली छेद देते. कर्मठपणापेक्षा ज्ञानोत्तर भक्तीचे दर्शन घडविते. मंदिरातील अघोरी उपासनेला व तर्क नसलेल्या परंपराप्रिय कर्माला वाजूला सारते. विवेक जागृत करून भक्तीचा सार्थ मार्ग आपल्यापुढे सक्रिय करते."

दोघीही गीता माऊलीच्या कन्या आहेत. दोघीही गीतार्थाच्या सोयऱ्या आहेत. त्या आपल्या दृष्टीने वेगळ्या; पण अंतरी अभिन्न झाल्या आहेत. इथे ज्ञानेशाची 'भावार्थदीपिका' पाजळणारी, तर म. गांधींची 'अनासक्तियोग' सांगणारी. दोघीही शुद्ध सत्वागळ्या. दोघीही तमाची काजळी फेडून राहिलेल्या. संकुचितपणाचा, क्षुद्रतेचा, विषमतेचा दोघींना तिटकारा. दोघींचा विश्वाला पोटाळून घेण्यासारखा व्यापकपणा'', असे विचारबीज घेऊन लेखक या तीर्थक्षेत्रात पदार्पण करतो. वाचकासाठी हा सारा प्रसंग केवळ वाचनीय नसून तो चिंतनीय व पुनःप्रत्ययाचा सानंद भाग झाला आहे. या लेखकाला इंद्रायणीचे पाणी ज्ञानाचे पाचक आणि भक्तीचे रोचक वाटते. त्यात त्याला विनोबांचे प्रतिबिंबही दिसते. एवढेच काय, या क्षेत्राचे लेखक वर्णन दर्शन घडवत नाही, तर आपल्यासह तो स्वतःचे पावन चिंतन घडवितो. आळंदीतील ज्ञानेश्वर भावंडांचे वर्णन 'हर्षशोकांच्या पार गेलेले सर्व स्थितप्रज्ञ. गांभीर्याचा सागर आणि धैर्याचा हिमाचल' या काव्यमय भाषेत केले आहे. या आळंदीत गेल्यावर आपले मन भावप्रवण असेल, संसारचिंतेचे गाठोडे इंद्रायणीच्या पुलापलीकडे टाकून तिथे गेलेले असेल, तर या आवारात प्रदक्षिणा करीत असताना एक प्रकारचा सर्वत्र भरलेला सूक्ष्म सुगंध आपल्या अनुभवाला येतो. हा सुगंध ज्ञानेश्वरांच्या विकसित आत्म्याचा सुगंध आहे. त्यात त्यांनी आपल्या हृदयदारी लावलेला मोगरीचा वेल बहरलेला आहे. एखाद्या अभिजात कलाकृतीचा सविकल्प समाधीने आस्वाद घ्यावा तसा लेखक या आळंदीच नव्हे, इतरही क्षेत्रांचा आस्वादपूर्ण अनुभव व्यक्त करतो. देहू या संत तुकाराम नगरीत त्याला 'देहूला पाहाण्याजोगे फार थोडे आहे; पण चिंतनाजोगे पुष्कळ आहे', अशी अनुभूती मिळते. नाथांच्या पैठणमध्ये 'जनता हाच जनार्दन आणि जनसेवा हीच भक्ती' अशी शुद्ध भावना उजळून निघते. संतांची तीर्थक्षेत्रे दर्शन घेण्यासाठी, त्यातील वर्णन करण्यासाठी नसतात. ती पुनःप्रत्ययातून तुम्हाला वारंवार चिंतनप्रिय झालेली असतात. लेखकाने सर्व पवित्र संतक्षेत्रे आपल्या वर्णनशैलीने तुमच्या-आमच्यासाठी पावन केली आहेत. ही संतक्षेत्रे दर्शनासाठी आसुसलेली नाहीत. त्यामागील आंधळ्या दंतकथेने, आंधळ्या चमत्काराने डागलेली नाहीत. या साऱ्यांना लेखकाची शैली छेद देते. कर्मठपणापेक्षा ज्ञानोत्तर भक्तीचे दर्शन घडविते. मंदिरातील अघोरी उपासनेला व तर्क नसलेल्या परंपराप्रिय कर्माला बाजूला सारते. विवेक जागृत करून भक्तीचा सार्थ मार्ग आपल्यापुढे सक्रिय करते. आपल्या या तीर्थयात्रेचा प्रारंभ 'विठेवरचे परब्रह्म' या सर्व संतांचे माहेरघर असलेल्या पंढरपूरने झाला आहे, तर ही यात्रा संत ज्ञानेश्वरांच्या आळंदी दर्शनाने संपते. यात्रेच्या मध्यभागी समर्थांचा सज्जनगड, ब्रह्मगिरीचा महिमा यातील निसर्गाचे सौंदर्य घडवीत आपल्या अंतःचक्षूचे पारणे फेडते आणि शेवट पैठण, देहू तसेच आळंदी दर्शन घडविते. सर्व संतांनी आपले मोक्षाचे स्थळ समाधीद्वारे आपल्यासमोर नवा आदर्श लेखन दाखविला. तीर्थ आणि देव यांना विशाल अर्थ देत आपल्या तीर्थयात्रेचे सार्थक केले.

या तीर्थयात्रेत एखाद्या क्षेत्राचे जे आपल्या प्रतिभेने रसग्रहण करताना लेखक वाचकांना आस्वादाच्या



अनुक्रमणिका

पातळीवर केव्हा घेऊन जातो ते कळत नाही. इथे आपण ते तीर्थक्षेत्र एक अभिजात कलाकृती म्हणून पाहतो. पंढरपूरच्या देवळातील सभामंडपाची फरशी व त्यावरील देणगीदारांची नावे वाचून त्यांच्या मनात 'अहंकाराचे फणामर्दन व्हायला किती सुंदर उपाय आहे' याविषयीचा आदरभाव आहे. त्याने केलेल्या वर्णनांत देवळांचे व मूर्तींचे सूक्ष्मवर्णन तो स्वभावोक्ती अलंकाराने आपल्या डोळ्यात भरवतो. यांतील विविध पौराणिक, ऐतिहासिक संदर्भ आपल्या ज्ञानात भर टाकीत, वाचकांना नवी वाट दाखवीत आपल्या ज्ञानात भर टाकतात. पंढरपूरहून परत फिरताना लेखक लिहितो, "चार दिवसांच्या तिथल्या वास्तव्यानंतर परत फिरताना मनात हुरहुर दाटली. आपले काहीतरी मागे राहिले आहे, असे सारखे वाटू लागले. तिथे आपले मन चोरीस गेले असून तेथे दिवसाढवळ्या अनादिकाळापासून त्यात नवा प्रत्यय वसला आहे. या यात्रेत त्याला मिळालेले ज्ञान, आपल्या प्रस्थानापूर्वी त्या त्या क्षेत्राविषयी मिळेल ती माहिती गोळा करून त्याची ही यात्रा सफल होते. तो हे मिळालेले ज्ञान त्या त्या ठिकाणी समक्ष ताडून पाहतो. अधिकारांचा संग्रह करतो. या सर्व लेखातील लेख सत्य-शिव-सुंदर विवेचन वाङ्मयीनदृष्ट्या बहुमोल होते. त्याने आपल्या वाङ्मयीन जीवनास यज्ञाच्या पातळीवर नेले. ते जीवनात रसाळ ठेवा झाले आहे. त्याच्या लेखणीतून उतरलेली व सर्वांच्या मनीमुखी असलेली ही क्षेत्रे वाचताना धन्यता होते. त्यानं या यात्रेसाठी अनेक ग्रंथांचे मनन, चिंतन केले आहे. या यात्रेसाठी तो आपले ज्ञान देणारे विविध संदर्भ दाखवूनही देतो. आज क्षेत्रस्थ लोक क्षेत्रापासून फार दूर गेले आहेत. त्यातील ज्ञान अवगत व्हावे अशी जिज्ञासा, धडपड नाही. आपल्या जीवनाची सांस्कृतिक व धार्मिक अंगे मलिन झाली आहेत. क्षेत्राच्या ठिकाणी उपाध्याय, धार्मिकता आणि शुचिता यांचा अभाव दिसतो. तेथील पूजकवर्गात श्रद्धा दिसत नाही. पूजेत कमंटपणा असतो. उपासनेत सेवेपेक्षा धंदा करताना दिसते. त्याच्या मते ही तीर्थस्थाने स्थळशुद्धी, आचारशुद्धी आणि भावशुद्धी यांचा मूर्तिमंत नवा आशय झाली पाहिजेत. या तीर्थस्थानी त्याला 'अय मे सफलं जन्म' दिसले पाहिजे. वाचकाच्या दानबुद्धीला भिक्षुकांच्या आग्रहातून नव्हे, तर आपल्या स्वयंप्रेरणेने अंकुर फुटले पाहिजेत. आमची क्षेत्रे जेव्हा स्वच्छता, सेवा, आतिथ्य, भक्ती-ज्ञान यांची आगरे बनतील तेव्हाच देवाचा खरा अधिकार त्यात दिसेल. तीर्थक्षेत्री बाजारू वृत्ती न दाखविता मूर्तिपूजेविषयीचे नियम कडक वास्तववादी झाले पाहिजेत. त्यातला भ्रष्टाचार निपटला पाहिजे. ज्यांना महाराष्ट्र देशात जन्म घेण्याचा अभिमान वाटतो त्यांना ही तीर्थयात्रा अभिमानास्पद होईल. वेरूळचा घृष्णेश्वर पाहताना ज्योतिर्लिंगाचे दर्शन व कैलास लेण्यासाठी सौंदर्यदृष्टी या उभयतांचा अपूर्व संगम झाला पाहिजे. देहू या तीर्थक्षेत्रात संत तुकारामाचे मंदिर नाही. सदेह वैकुंठास गेल्यामुळे कुठे समाधीचा चिराही नाही; पण भाविकांना या उणिवांची जाणीव शल्य देऊन जाते. ते विठ्ठलाच्या आकाशात तुकोबांना पाहतात. ही शिकवण भागवतधर्म देतो. या तीर्थांतील आळंदीत इंद्रायणीचे पाणी ज्ञानाने अधिक पातळीवर पावन होते. महाराष्ट्रातील समाजावर अधिराज्य करणाऱ्या दैवतांचा अभ्यास करून त्याचा सामान्य जनांना त्या त्या ग्रंथातील परिचय देणारे तीर्थरूप महाराष्ट्र ख्यातकीर्त झाले आहे. अमुकतमुक स्थान जागृत आहे, असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा ती साक्ष आपल्या भावार्थ अंतःकरणाला कोणत्या तरी प्रकारे पडलेली असते. त्यातल्या संतांच्या परमउदार भागवत धर्माशी ज्यांचे आतले नाते आहे, त्यांना ही तीर्थे कधीच जुनी वाटत नाहीत. त्यांचा अतिपरिचय होऊनही त्या स्थानाची अवज्ञा होत नाही. भक्तीच्या डोळ्यांना इथे कैवल्य बागडताना आणि अद्वैत खेळताना दिसते. इथे संतांची संस्कृती अभिमानशून्य कधीच होत नाही. यात आपणास वाचताना अल्पसा साक्षात्कार घडतो, हे ओघाने आले. वाचकासाठी हे पसायदान आहे.

तीर्थक्षेत्राचे एखादे स्थळ लेखक स्वतः कलावंत होऊन त्या स्थळाकडे एक अभिजात कलाकृती म्हणून चित्रित करताना इथे दिसतो. त्या स्थळाची ऐतिहासिक व पौराणिक परंपरा त्यातील संदर्भ यातील बारकावे वाचकापुढे उलगडले जातात. ही एक प्रतिभावंताने केलेली नवोन्मेषप्रधान अशी निर्मिती असते. तो वाचकाच्या

तितक्याच तादात्म्याने आस्वाद घेत असतो. त्यात रसाळवर्णन, कल्पकतेचे नवे नवे पैलू भावनात्मकतेने केलेले त्या परिसराचे चिंतन आणि एकूण या प्रवाहातील सत्य-शिव-सुंदर या त्रिवेणी प्रवाहाचे दर्शन, असा हा अनन्यसाधारण देखावा आपण 'तीर्थरूप महाराष्ट्रा'त अनुभवीत असतो. यापूर्वी अशी तन्मयता, तटस्थता नवनिर्मितीने केलेली दिसत नाही. 'तीर्थरूप महाराष्ट्रा'चे हे एक वैशिष्ट्यपूर्ण अनुभवजन्य तीर्थदर्शन आहे. तीर्थरूप महाराष्ट्र यात लेखकाने आपल्या अनुभवास आलेली तीर्थरूप महाराष्ट्राची विविध रूपे आपण इथे अनुभवीत नसून, त्यात तीर्थरूप महाराष्ट्राचे विविध असे अनुभव नसून, त्यात तीर्थस्थळाचे भेटवर्णन आहे. हा केवळ प्रवास नाही, तर वाचकासाठी केलेले स्थळवर्णन कलेच्या पातळीवर चित्रित झाले आहे. पं. महादेव शास्त्री म्हणजे शुद्ध सात्त्विकता आहे. त्यात पुन्हा शुचिर्भूतता, धार्मिकतेची जोड देऊन आपल्या व्यक्तिमत्त्वाचे प्रबिबिंब या दर्शनशैलीत झालेले आपण पाहतो. लेखकाने ज्या ज्या तीर्थस्थळाला पाहिले, ते ऐतिहासिक, पौराणिक संदर्भासह आपल्याही दृष्टीत उतरते. त्यातील सूक्ष्मता लेखकाच्या सौंदर्यपूर्ण शैलीतून साकार झालेली आहे.

या तीर्थक्षेत्रातील एकेक ठिकाण लेखक आपल्या सूक्ष्म निरीक्षणातून आपल्यापुढे साद्यंत ठेवतो. त्याला भक्तिरसात चिंब करतो. या स्थळाची मंदिर प्रदक्षिणा तशीच नगर प्रदक्षिणा अशीच ओघवती झाली आहे. त्यात विठ्ठलमूर्तीचे सचैल दर्शन, त्याच्या प्रत्येक अवयवाचे दर्शन ससंदर्भ देऊन घडविलेले दर्शन सौंदर्यपूर्ण आहे. या वर्णनात नव्हे, तर दर्शनात ज्ञान-कर्म-भक्ती यांचा सुरेख असा त्रिवेणी संगम आपल्यापुढे दर्शनीय होतो. मंदिरातील पूजेलाही लेखकाने नवा संदर्भ दिला आहे. वाचकाला नवविधा भक्तीचे दर्शन, वारकरी संप्रदायाचा भोळाभाव यात नसून तो आपल्यासाठी ज्ञानभक्तीचा रस आहे. या भक्तिमार्गाचे पूर्ण विकसित स्वरूप म्हणजे संतांचा भागवत धर्म. ज्यात वैदिक धर्माचा मधुर परिपाक आहे. वारकरी संप्रदाय 'बहुसोपा' आहे. त्यात सोवळ्याचा अतिरेक नाही. कर्मांची कटकट नाही. तंत्राची भानगड नाही. ज्या स्थळाचे दर्शन घेऊन आपण मागे परतल्यावर आपले काहीतरी मागे उरले आहे याची जाणीव होते त्याचे दर्शन आहे. भागवत धर्माची ही एक पुण्य सरिता आहे. या लेखकाला ज्ञानेश्वर समाधीकडे कापूर जळत जावा आणि अव्यक्त असा सुगंध तेवढा नाकाशी जाणवत राहावा, असे या तीर्थक्षेत्राचे दर्शनमूल्य दिसते. या तीर्थक्षेत्राचे लेखकाने आपल्या दर्शनाच्या निमित्ताने केवळ चिंतन वाचकांना घडविले. इथेच दर्शनानंतर महाराष्ट्राची संस्कृती संतांच्या ओवीतून, अभंगातून वाचकास वेगळे दर्शन घडते. त्याला आळंदी दर्शनात स्थळापेक्षा समाधी दर्शन अधिक मिळते. तर देहू नगरीत भरपूर चिंतनशीलता दिसते.

*'देहूला जाऊन। देह विसरावा ।*
*अंतरी स्मरावा । तुकाराम।।'*

अशा या सत्याग्रही तुकारामाचे चिंतनाने व्यापलेले अमूर्तरूप प्रगटते. असे सर्व तीर्थांचे दर्शन लालित्यपूर्ण, रसपूर्ण, सौंदर्यपूर्ण, भावपूर्ण झालेले आहे. एकूण 'तीर्थरूप महाराष्ट्रा'तील लेखांना एकाच वेळी ऐतिहासिक मूल्य, सांस्कृतिक मूल्य, संदर्भ मूल्य आणि पौराणिक मूल्य या सर्वांचे एक अजोड प्राक्तन आपण वाचताना पाहतो. ही सारी मूल्ये आजच्या परिस्थितीत जपणे किंवहुना त्यातून आपले आत्मनिरीक्षण व आत्मपरीक्षण करणे महत्त्वाचे आहे.

या तीर्थरूप महाराष्ट्राचे आजच्या एकूण परिस्थितीत या यात्रेचे नवे आकलन व्हावे ते नव्या दृष्टीतून. हे आकलन परंपरा जपत नवतेकडे झुकलेले असावे. आज देऊळ, दर्शन, त्यातील पूजा उपासना या बाबतीत जो लिंगभेद आहे, त्याविषयी जो संघर्ष चालू आहे त्यातून सामान्य माणसापुढे एक वादळी संभ्रम निर्माण झाला आहे. त्यातही पुन्हा जे विवेकी धार्मिक प्रश्न निर्माण होतात त्यातून एक डसणाऱ्या माशांचे उठलेले मोहोळ दिसेल. या सर्व देवळांतील विविधता लक्षात घेता कार्तिकस्वामी, शनि शिंगणापूर, विदर्भातील अनेक वादग्रस्त देवळे, कोल्हापूरची अंबाबाई या देवळांतील संघर्ष डोळ्यांसमोर उभा राहतो. या संघर्षातील विवेकाची पातळी घसरलेली दिसते. त्यातून निर्माण झालेले अनेक प्रश्न जसजसे खोलात जाऊ तसतसे अधिक गोंधळ निर्माण





अनुक्रमणिका

करणारे झाले आहेत. एवढेच काय द्वारकापीठाचे शंकराचार्यांनी शिर्डीतील साईबाबांविषयी केलेले विधानही अधिक गोंधळात टाकणारे झाले आहे. अशा वेळी पं. महादेव शास्त्री यांची तीर्थरूप महाराष्ट्राची यात्रा भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांचा नवा विवेकी सांधा जोडणारी झाली आहे. अलीकडे विद्या बाळ आणि मंगला आठलेकरांनी देवळातील स्त्रियांचा संघर्ष बघून त्यांना दिलेला विवेकी सल्ला तितकाच सर्वांना अंतर्मुख करणारा झाला आहे. महाराष्ट्रातील तीर्थयात्रा ज्या काळात पं. महादेवशास्त्रींनी केली ती देवळे आज आंतर्बाह्य भ्रष्ट होताना आपण पाहतो. सगळीकडे देवळांचा बाजार, तेथील भक्त, पुजाऱ्यांचा बाजार आपण जेव्हा पाहतो तेव्हा शास्त्रीबुवांचा 'तीर्थरूप महाराष्ट्र' नव्याने डोळ्यांत अंजन घालतो. आज देवळे, त्यांच्या यात्रेभवती केवळ सवंग उत्सवप्रियतेचा थाटमाट राजकीय वळणाने साजरा होताना दिसतो. त्यात क्षुद्र स्वार्थ लपलेला असतो. अहंकाराचा देखावा असतो. ही जमलेली उत्सवातील गर्दी दैनंदिन जगण्यातील आजच्या स्पर्धेचे रूप दाखवीत स्वतःची धास्ती व भीती दाखवून देते. देवळे ही अलीकडे बिनभांडवली धंद्याचे ठिकाण झाली आहेत. या संदर्भात चित्रपटातून त्याचे हिडीस दर्शन दाखवून अनेकांनी आपले विवेकी मनोरंजन केलेले आहे. जो दगड अनेक वेळा पायाने तुडविलेला असतो तो शेंदूर लावला की, देवळातला देव होतो व त्याभोवती भक्तांचा बाजार भरतो. अशा वेळी 'तीर्थरूप महाराष्ट्रा'तील शास्त्रीबुवांच्या प्रस्तावना नव्याने आपणास जागृत करतात. त्यात महाराष्ट्रीय संस्कृतीच्या व्यापक आणि तपशीलवार अशा आपल्या तीर्थयात्रेच्या माध्यमातून केलेले मनोगत आजच्या स्थितीत महाराष्ट्रीय जनतेला जागृत करणारे आहे. या तीर्थक्षेत्रातील देवळे, मूर्ती, पंथ यांच्या संस्कृतीविषयक आपली नवी जिज्ञासा वाढविणारी आहे. त्यात सुशिक्षित आणि सुसंस्कृत माणसांना आपल्या परंपरा आणि नवता यांचा एकत्र प्रवाहाकडे जाणारा भाग दिसेल. आपल्या या समाजाच्या जिज्ञासेची पूर्ती करणे व तिला नव्याने अधिक वास्तव सन्मुख ज्ञान देत मार्गदर्शन करणे महत्त्वाचे झाले आहे. या दृष्टीने शास्त्रीबुवांच्या तीर्थयात्रेकडे पाहिले पाहिजे. त्यात आपली भौतिक निर्मिती अध्यात्माकडे वळलेली दिसेल. देवळांचे जेव्हा अंतर्बाह्य बाजारीकरण होते तेव्हा भक्तीचे व पर्यायाने भक्तांचे गिऱ्हाईक होऊन बाजारीकरण होते. त्याला राजकारणाचे नवे रूप प्राप्त होते. आपल्या परंपरेकडे आंधळे होऊन पाहू नये; पण नवतेलाही अहंकाराचा स्वार्थ नसला पाहिजे. आपल्याला आपल्या धर्मक्षेत्राचे ज्ञान नाही आणि करून घेण्याची जिज्ञासा नाही. आपली धर्मक्षेत्रे, तीर्थक्षेत्रे ही खऱ्या धर्माची सौदी झालेली आहेत. तिथे आपली स्थळबुद्धी आणि भावबुद्धी मूर्तिमंत दिसली पाहिजे. कुठल्याही देवळात गेलेल्या यात्रेकरूस दान करण्याची, देणगी देण्याची इच्छा असेल, तर त्याच्या या दानबुद्धीला पुजाऱ्याच्या आग्रहाने नव्हे, तर स्वयंप्रेरणेने अंकुर फुटले पाहिजेत. तीर्थ आणि देवळातला देव यांचा आपण समजतो त्याहून फार मोठा व्यापक व पवित्र अर्थ आहे, आणि तो घेऊन आपण देऊळ प्रवेश केला पाहिजे. सर्व देवता क्षेत्रे, अवतार क्षेत्रे, संत क्षेत्रे यांचा विचार करून उपासना केली पाहिजे. सर्व क्षेत्रांविषयी, तेथील रूढींविषयी आंदोलने करून विजय प्राप्त करता येईल. मात्र त्यानंतरची आपल्यातील जागृती चौफेर नजरेने अंतर्मुख झालेली दिसली पाहिजे. शास्त्रीबुवांचा 'तीर्थरूप महाराष्ट्र' वाचताना आपण मागे पाहून पुढे कठोर आत्मपरीक्षणाकडे वळतो. आचार्य अत्रे यांनी या शास्त्रीबुवांच्या एकूण लिखाणाविषयी दिलेला अभिप्राय आजही महत्त्वाचा वाटतो. तो असा- ''महाराष्ट्रातील तीर्थांची माहिती शुद्ध, सोप्या आणि रसवाही भाषेत शास्त्रीबुवा सांगतात. नदीच्या विशाल पात्रातील वाहत्या पाण्याप्रमाणे हे ज्ञानभक्तीचे जल सदैव ताजे, पवित्र आणि मनोरंजक असल्याने त्याला ज्ञानभक्तीतीर्थ म्हणणे युक्त होईल.'' (दैनिक मराठा- १२/१/१९६९)

●

**मधु जामकर**
'दिलासा',
स्नेहनगर,
परळी वैजनाथ- ४१५५
चलभाप : ९८५०२९४६८६



अनुक्रमणिका





समीक्षा

डॉ. राजा दीक्षित

# गतकाळाची गाज : स्त्री आत्मकथने आणि समाजदर्शन


डॉ. नीलिमा गुंडी या मराठीच्या अभ्यासू प्राध्यापक म्हणून ओळखल्या जातात. 'मराठी साहित्यातील रेल्वे'वरचा म.सा.पत्रिकेतला त्यांचा जुना लेख असो, अलीकडचे वृत्तपत्रीय सदर असो, साहित्य-संमेलनाध्यक्ष डॉ. अरुणा ढेरे यांच्या सत्काराचे भाषण असो की, 'देठ जगण्याचा' यासारखा ललित लेखसंग्रह असो, सर्वत्रच त्यांची अभ्यासूवृत्ती प्रकटल्याचे दिसून येते. त्यांची समीक्षा निव्वळ रसग्रहणात्मक नसते. त्या कवयित्री आहेत. त्यांच्या समीक्षेत काव्यात्मता असतेच; पण सामाजिक चिंतनशीलतेची जोडही तिला असते. 'स्त्री-संवेद्य' हा त्यांचा वैचारिक लेखसंग्रह, 'स्त्रीमनाचे संवेदन जाणून घेण्याच्या मध्यवर्ती सूत्राभोवती गुंफलेला आहे.' त्यांच्या मनोगतात त्या म्हणतात, ''स्त्रीचे संवेदनविश्व तिच्या साहित्यातून उलगडते. त्यातून तिच्या भावविश्वाचे दर्शन घडते, काळानुरूप त्यात होणाऱ्या घडामोडींचे सूक्ष्म चित्रण त्यात शब्दाशब्दांत प्रतिबिंबित झालेले असते.... स्त्रीचे संवेदनविश्व हे एक हलतेबोलते समाजचित्रच असते. त्यातून समाजविकासासाठी विधायक अशी मर्मदृष्टी कळतनकळत मिळत असते.'' डॉ. नीलिमा गुंडी यांच्या या भूमिकेचा पुरेपूर प्रत्यय 'गतकाळाची गाज' या स्त्री-आत्मकथनांविषयीच्या पुस्तकातसुद्धा येतो.

१९१० साली रमाबाई रानडे यांचे 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. स्त्रीने लिहिलेल्या मराठीतील या पहिल्या आत्मकथनापासून आजवर लिहिल्या गेलेल्या सुमारे दोनशे स्त्री-आत्मकथनांचा वेध डॉ. गुंडी यांनी घेतलेला आहे. अर्थात, सुमारे सव्वादोनशे पानांचे हे पुस्तक म्हणजे स्त्री-आत्मकथनांचा समग्र आढावा नव्हे. 'स्त्रीलिखित आत्मकथनांच्या आधारे आपल्याकडील सामाजिक-सांस्कृतिक स्थित्यंतरांची प्रक्रिया जाणून घेण्याचा' तो एक उल्लेखनीय प्रयत्न आहे. तो ऐतिहासिक आहे आणि समीक्षात्मकही आहे; पण तो स्त्री-आत्मकथनांद्वारे दीडशे वर्षांतील सामाजिक संक्रमणांचा वेध घेण्याचा एक प्रयोग आहे.

'गाज' याचा मला अभिप्रेत असणारा अर्थ आधी सांगतो आणि नंतर त्याचा संबंध पुस्तकाशी जोडतो. गाज म्हणजे निव्वळ आवाज नव्हे; त्या आवाजाला अर्थसघनता असते. अथांग सागराच्या योगसाधनेचे ते जणू स्पंदनच असते. हे स्पंदन कसे साकारते? प्रशांत आणि प्रक्षुब्ध अशी समुद्राची दोन रूपे एकमेकांत मिसळत राहतात, घुसळत राहतात. त्यातून समुद्राचा

गतकाळाची गाज :
स्त्री-आत्मकथनांद्वारे
सामाजिक संक्रमणाचे दर्शन
लेखिका : नीलिमा गुंडी,
मौज प्रकाशन गृह, मुंबई
पृष्ठे एकोणतीस + २१२
मूल्य : ३५०/- रु.



फेसाळता अंतःस्वर निर्माण होतो. त्याच्या निनादाचा जिवंत झरा म्हणजेच जणू गाज! साहित्य आणि समाजजीवन या दोहोंची मार्गक्रमणासुद्धा द्वंद्वात्मक (dialectical) असते. घडणारा इतिहास आणि लिहिला जाणारा इतिहास यांनासुद्धा ही द्वंद्वात्मकता लागू असते. या सर्वच संदर्भांमध्ये स्थिती आणि स्थितीविरोध यांच्या संघर्षात्मक संवादातून स्थितीबदल घडताना दिसतो. घनगंभीर गाजसुद्धा द्वंद्वात्मकतेतून अवतरलेली असते. 'गतकाळाची गाज' हे ग्रंथशीर्षक अशा रूपकात्मक पद्धतीने समजावून घ्यायला हवे. या रूपकात्मक दृष्टीने पुस्तकाच्या अंतरंगात डोकावल्यावर निराशा पदरी येत नाही, हे लेखिकेचे महत्त्वाचे यश म्हटले पाहिजे. स्त्री-आत्मकथनांवरचे हे पुस्तक 'महाराष्ट्राच्या प्रबोधनपरंपरेला अर्पण' केले जाण्याचे रहस्य समजले की, त्याचे आकलन योग्य दिशेने होऊ शकते.

टेरी इगल्टनने म्हटल्यानुसार साहित्य ही सामाजिक निर्मिती आणि सामाजिक शक्ती असते. हॅरी लेविनचे शब्द वापरायचे तर, साहित्य हा जसा सामाजिक कारणांचा परिणाम असतो, तसेच ते सामाजिक परिणामांचे कारणही असते. त्यामुळे साहित्याकडे समाजशास्त्रीय दृष्टीने पाहणे शक्य असते. तसा प्रयत्न डॉ. गुंडी यांच्या पुस्तकातसुद्धा आढळून येतो. आत्मकथन / आत्मचरित्र हा वाङ्मयप्रकार तर सामाजिक अभ्यासासाठी विशेष महत्त्वाचा असतो. कारण तो एक प्रकारचा सामाजिक दस्तऐवज असतो. तो एक मिश्र वाङ्मयप्रकार आहे. त्यामध्ये लालित्यही असते आणि इतिहासही असतो. जर्मन महाकवी गटे याने आपल्या आत्मचरित्राला 'पोएट्री अँड ट्रूथ' असे नाव दिले, हे अर्थपूर्ण होय. आत्मचरित्र हे खरोखरच काव्यात्मक सत्य आणि सत्यात्मक काव्य असते. स्त्री-आत्मकथनांची सामाजिक अर्थवत्ता शोधणे, हे त्यामुळेच शक्य आणि स्तुत्य आहे. डॉ. नीलिमा गुंडी त्यांचा हा शोध स्त्रीवादी परिप्रेक्ष्यातून घेऊ पाहतात, हेसुद्धा महत्त्वाचे.

'स्त्रीलिखित आत्मकथने आणि सामाजिक संक्रमण' या शीर्षकाचे प्रास्ताविक, त्यानंतरची चौदा प्रकरणे आणि विस्तृत संदर्भ-ग्रंथ सूची अशी या पुस्तकाची रचना आहे. एकोणिसाव्या शतकात शिकू लागलेल्या उच्चभ्रू स्त्रियांपासून आजकालच्या दलित-वंचित स्त्रियांपर्यंत एकंदर स्त्रीवर्गासाठी शिक्षण ही कशी अडथळ्यांची शर्यत होती, याचा वेध आत्मकथनांच्या आधारे पहिल्या प्रकरणात घेतलेला आहे. 'नाते स्त्रीचे स्त्रीशी' या प्रकरणात स्त्रियांच्या आपापसांतील नात्यांचे अनुभव आणि अनुबंध उलगडत जातात. आई-आजीच्या कारुण्यमय जगण्याशी नाळ जोडल्याच्या भावनेपासून व्यक्तिगत संबंधांपलीकडच्या व्यापक भगिनीभावापर्यंतचा प्रवास चित्रित होतो. त्या प्रवासातून सामाजिक नातेसंबंधांचे जे जाळे विणले जाते, त्याचा प्रत्यय आत्मकथनांद्वारे येतो. ही प्रक्रिया लेखिकेने अनेक उदाहरणांद्वारे स्पष्ट केली आहे. 'स्त्रीचे स्पर्शसंवेदनविश्व' हे प्रस्तुत पुस्तकातील विशेष उल्लेखनीय प्रकरण म्हणता येईल. मानवी संवेदना आणि आविष्कार यांमध्ये स्पर्श-बोली महत्त्वाची असते; पण आपण या बोलीला मुख्यतः मौनातच बंदिस्त केलेले असते. त्यामुळे स्त्री-आत्मकथनांमधून प्रकट होणारे अनुकूल-प्रतिकूल स्पर्शांचे भावनिक आणि लैंगिक अनुभवविश्व ज्या स्पष्ट; पण संयत पद्धतीने लेखिकेने उलगडून दाखवले आहे, त्याचे अप्रूप वाटते. ''स्त्रीप्रश्नांकडे पाहताना समाजशास्त्रीय अंगाने केलेल्या निरीक्षणांना मानसशास्त्रीय अंगाने विचार करताना प्राप्त झालेल्या मर्मदृष्टीची जोड द्यायला हवी,'' हे डॉ. गुंडी यांचे प्रतिपादन स्वीकारार्ह आहे. पुरुष-प्रबोधनाची जी आवश्यकता त्या अधोरेखित करतात, तीही स्वीकारार्ह आहे.

स्त्री-आत्मकथनांमधून स्त्रियांची घुसमट कशी बोलकी होते हे 'स्त्रीचे भावजीवन आणि सहजीवन' या प्रकरणातून वाचायला मिळते. 'सह'जीवनातील मानसिक अंतर ही अनेक दांपत्यांची समस्या. पुरुषशाहीमुळे ती तीव्र बनलेली असते. अनेक कर्तृत्ववान जोडप्यांबाबतसुद्धा याचा प्रत्यय येतो. ''परिचय फक्त देहाचा होता. स्वभावाचा वगैरे असण्याचं कारणच नव्हतं,'' यासारखे एखाद्या आत्मकथेतील विधान सहजीवनविषयक दारुण सत्यावर प्रकाश टाकते. म्हणून तर प्रकरणाच्या समारोपात लेखिका नोंदवते, ''काही स्त्रीलिखित आत्मकथनांमधून जणू कोंडलेला लाव्हारसच फुंफाटत बाहेर आल्यासारखे वाटते.'' विवाह करताना जात, धर्म, आर्थिक व वर्गीय स्तर, तसेच देश, वंश यांच्यातील सांस्कृतिक अंतर

ओलांडण्याचे धैर्य दाखवणाऱ्या स्त्रियांची अनेक उदाहरणे आहेत. ती केवळ लग्नापुरती नव्हे, तर आयुष्यभराचीच अग्निपरीक्षा असते. 'सांस्कृतिक अंतर ओलांडताना...' या प्रकरणात तिचा वेध घेतलेला आढळतो. अशा विवाहांमध्येही सुखदायक अनुभवांचे काही अपवाद असतात. एकीकडे ते नमूद करताना आज उद्‌भवलेल्या 'ऑनर किलिंग'च्या समस्येचा निर्देशही लेखिका करते. अस्मिता माणसाला माणूसपण देते आणि समाजशीलत्वामुळे हे माणूसपण समृद्ध बनते. म्हणूनच आत्मभान आणि समाजभान महत्त्वाचे. अनेक चळवळी त्यातून फोफावतात, समस्या सुटू लागतात आणि सामाजिक संक्रमणाला चालना मिळते. मात्र पुरुष आणि स्त्रिया यांच्या बाबतीत बरेचदा ही प्रक्रिया खूप मागे-पुढे झालेली दिसते. आपल्याकडे १९७५ नंतर म्हणजे आंतरराष्ट्रीय महिला वर्षापासून स्त्रियांच्या संदर्भात या प्रक्रियेला चालना मिळाली. मात्र तिची पूर्वचिन्हे अगदी एकोणिसाव्या शतकातसुद्धा दिसू लागली होती. तेव्हापासून 'स्त्री सबलीकरणा'च्या टप्प्यापर्यंतचा आलेख 'स्त्रीचे आत्मभान आणि समाजभान' या प्रकरणात काढलेला आहे. त्यात स्त्री-आत्मकथांमधील हरतऱ्हेची उदाहरणे तर येतातच; पण त्यांना मिळालेली तात्त्विक चर्चेची जोडही महत्त्वाची ठरते. अलीकडच्या टप्प्यातील सामूहिकता, चळवळी यांचा संदर्भ घेऊन लेखिका या निष्कर्षाप्रत येते, ''अशा वेळी स्त्रीकर्तृत्वाचा गुणाकारच त्यातून अनुभवता येतो. अशा वेळी आत्मभान आणि समाजभान हे एकाच देठावर उमलणारे वाल्हे दुल्हे कोंब वाटू लागतात. स्त्रीचे हे लख्खपणे जागे होणारे द्विविध भान पाहिले, की वाटते, कोणी अन्यायाने स्त्रीचे कधीकाळी वस्त्रहरण केले असेल; पण अशा जागृत स्त्रीचे सत्त्वहरण करणे नक्कीच सोपे नाही!'' राजकारण, शिक्षण, संशोधन, सामाजिक कार्य, विविध प्रकारचे व्यवसाय, चाकोरीबाहेरचे उपक्रम यांमधील स्त्री-कर्तृत्वाबद्दलची चर्चा आठव्या व नवव्या प्रकरणांमध्ये आढळते. स्त्री-आत्मकथनांच्या विविधतेचा प्रत्यय त्यांमधून येऊ शकतो.

भाषाव्यवहाराची स्त्री-विशिष्ट रूपे असतात. स्त्रियांची म्हणून एक मौखिक संस्कृती असते. स्त्रीच्या सर्जनशील आविष्कारांची एक सृष्टीच विकसित झालेली

**" अस्मिता माणसाला माणूसपण देते आणि समाजशीलत्वामुळे हे माणूसपण समृद्ध बनते. म्हणूनच आत्मभान आणि समाजभान महत्त्वाचे. अनेक चळवळी त्यातून फोफावतात, समस्या सुटू लागतात आणि सामाजिक संक्रमणाला चालना मिळते. मात्र पुरुष आणि स्त्रिया यांच्या बाबतीत बरेचदा ही प्रक्रिया खूप मागे-पुढे झालेली दिसते. आपल्याकडे १९७५ नंतर म्हणजे आंतरराष्ट्रीय महिला वर्षापासून स्त्रियांच्या संदर्भात या प्रक्रियेला चालना मिळाली. मात्र तिची पूर्वचिन्हे अगदी एकोणिसाव्या शतकातसुद्धा दिसू लागली होती. तेव्हापासून 'स्त्री सबलीकरणा'च्या टप्प्यापर्यंतचा आलेख 'स्त्रीचे आत्मभान आणि समाजभान' या प्रकरणात काढलेला आहे. त्यात स्त्री-आत्मकथांमधील हरतऱ्हेची उदाहरणे तर येतातच; पण त्यांना मिळालेली तात्त्विक चर्चेची जोडही महत्त्वाची ठरते. अलीकडच्या टप्प्यातील सामूहिकता, चळवळी यांचा संदर्भ घेऊन लेखिका या निष्कर्षाप्रत येते. "**

असते. स्त्रीची भाषा गेल्या दीडशे वर्षांत कशी बदलत गेली, याचा प्रत्ययकारी शोध भाषाविषयक प्रकरणात घेतल्याचे आढळते. वाक्प्रचार, म्हणी, उखाणे, स्त्री-गीते, विनोद, गोष्टीवेल्हाळपणा, प्रादेशिक बोली, समूहनिष्ठ भाषाविष्कार, भाषेचे हेल अशा गोष्टींचे बारकावे टिपून जी सोदाहरण चर्चा केली आहे ती उद्‌बोधक आहे. स्त्रियांची आत्मकथने हा मौलिक सामाजिक दस्तऐवज असल्याची जाणीव सबंध पुस्तकभर व्यक्त होत राहते. मात्र त्यावरील एका स्वतंत्र प्रकरणामुळे व त्यातील समाजशास्त्रीय दृष्टीमुळे वाचकांच्या मनावर ती अधिक ठसते. सामाजिक संबंध हे समाजाच्या बांधणीचे दगड आहेत. या संबंधांची पद्धतशीर शास्त्रीय चर्चा समाजशास्त्रज्ञांनी केलेली आहे; पण सामान्य व्यवहारात 'नातेसंबंध' हा शब्दप्रयोग करून त्यांचे जाळे कसे पसरलेले असते याची प्रचिती आपण साहित्यातून घेतो आणि वाङ्मयीन समीक्षेच्या मर्यादेत त्याचा वेधही घेतला जातो. 'नातेसंबंधांचा लेखाजोखा' हे प्रकरण म्हणजे त्याचेच एक उदाहरण म्हणता येईल. 'स्त्रीवादी परिप्रेक्ष्यातून पाहिल्याशिवाय, 'लिंगभाव' (gender) या कोटिक्रमाचा विचार केल्याशिवाय स्त्रीसाहित्याचे आकलन योग्य रीतीने होऊ शकत नाही. त्यामुळे लेखिकेने

> “ स्त्री-आत्मकथनांची संख्या अन्य भारतीय भाषांपेक्षा मराठीत अधिक आहे; पण या आत्मकथनांना मर्यादा पडलेल्या आहेत. हे नियंत्रक घटक कधी बाह्य स्वरूपाचे, तर कधी अंतर्गत स्वरूपाचे असतात. एका स्वतंत्र प्रकरणात केलेली त्यांची चर्चा अर्थपूर्ण आहे. असे नियंत्रक घटक सर्व साहित्यव्यवहारावरसुद्धा परिणाम घडवत असतात आणि एकंदर सामाजिक अभिरुचीशी त्यांचा संबंध असतो. थोडक्यात का होईना, लेखिकेने याविषयीच्या चर्चेला हात घातला, हे महत्त्वाचे. समारोपाच्या प्रकरणात डॉ. नीलिमा गुंडी म्हणतात, ''आज 'गतकाळाची गाज' कान देऊन ऐकण्याची गरज आहे. आपल्या भूतकाळाचा वर्तमानकाळाशी असणारा सांधा जाणून घेऊन भविष्यकाळाला समाजविधायक आकार देण्यासाठी त्याची नितान्त गरज आहे.'' साहित्यिक मीमांसा आणि सामाजिक बांधिलकी यांच्या सुजाण मिलाफातूनच अशा निष्कर्षाप्रत पोहोचता येते! ”

---

या प्रकरणात केलेली चर्चा विशेष मोलाची आहे. किंबहुना या चर्चेत एका स्वतंत्र ग्रंथाची बीजे आहेत.

स्त्री-आत्मकथनांची संख्या अन्य भारतीय भाषांपेक्षा मराठीत अधिक आहे; पण या आत्मकथनांना मर्यादा पडलेल्या आहेत. हे नियंत्रक घटक कधी बाह्य स्वरूपाचे, तर कधी अंतर्गत स्वरूपाचे असतात. एका स्वतंत्र प्रकरणात केलेली त्यांची चर्चा अर्थपूर्ण आहे. असे नियंत्रक घटक सर्व साहित्यव्यवहारावरसुद्धा परिणाम घडवत असतात आणि एकंदर सामाजिक अभिरुचीशी त्यांचा संबंध असतो. थोडक्यात का होईना, लेखिकेने याविषयीच्या चर्चेला हात घातला, हे महत्त्वाचे. समारोपाच्या प्रकरणात डॉ. नीलिमा गुंडी म्हणतात, ''आज 'गतकाळाची गाज' कान देऊन ऐकण्याची गरज आहे. आपल्या भूतकाळाचा वर्तमानकाळाशी असणारा सांधा जाणून घेऊन भविष्यकाळाला समाजविधायक आकार देण्यासाठी त्याची नितान्त गरज आहे.'' साहित्यिक मीमांसा आणि सामाजिक बांधिलकी यांच्या सुजाण मिलाफातूनच अशा निष्कर्षाप्रत पोहोचता येते!

प्रस्तुत परीक्षणात विविध आत्मकथनांमधील विशिष्ट उदाहरणे दिलेली नाहीत. शब्दमर्यादेमुळे ते शक्य नाही आणि वाचकांनी ती मूळ पुस्तकातून पाहावीत, असाही उद्देश आहे. 'मिळून साऱ्याजणी'तील लेखमालेला लेखिकेने ग्रंथरूप दिलेले आहे. अर्थात, मूळ लेखांवर आवश्यक संस्करण करून गरजेनुरूप त्यांचा विस्तारही केलेला आहे. हे मूलतः स्त्री-आत्मकथनांच्या समान संदर्भ चौकटीतील; पण एकेका विशिष्ट सूत्राभोवतीच्या सुट्या लेखांचे एकत्रीकरण आहे. त्यामुळे अपरिहार्यपणे त्यात पुनरुक्ती घडताना दिसते. या लेखनाला समाजशास्त्रीय व स्त्रीवादी बैठक असली, तरी मूलतः साहित्य व समीक्षेच्या क्षेत्रातील व्यक्तीने हे लेखन केल्याचे विसरून चालत नाही. साहित्याचे समाजशास्त्र आणि स्त्रीवाद यांची तात्त्विक बैठक आणि संशोधनपद्धती यांचा काटेकोर अवलंब या पुस्तकात आढळणार नाही; पण साहित्यिक चर्चेला त्यांची जोड देण्याची जी दृष्टी डॉ. नीलिमा गुंडी यांनी दाखवली आहे, तिला दाद द्यायला हवी. निव्वळ रसग्रहणात्मक समीक्षेच्या चाकोरीत न अडकता अधिक मोठ्या रंगपटावरचे जे विवेचन व विश्लेषण त्यांनी केले आहे, ते स्वागतार्ह आहे. हे पुस्तक 'मौज प्रकाशन गृहा'ने प्रकाशित केले आहे. स्वाभाविकपणे निर्मितीचे अंग सफाईदार आहे. मात्र एका उणिवेचा उल्लेख करायला हवा. संदर्भ-ग्रंथ-सूचीमध्ये यादीतील आकडे देताना मूळ नोंदीमध्ये काही नोंदी नंतर समाविष्ट केलेल्या असाव्या. त्यामुळे ४ आणि ५ यांच्यामध्ये '४अ' (आणि त्याच पद्धतीने '७६अ', '१२९अ') अशी पुस्ती जोडलेली आहे. पूर्वी प्रबंधांच्या टंकलेखनात असे केले जात असे; पण मुद्रणतंत्रातील प्रगतीमुळे आता असे ठिगळकाम न करता छापता छापतासुद्धा सहजपणे आकड्यांचा क्रम एकसंध ठेवून भर टाकता येते. वरवर किरकोळ वाटणारी ही उणीव मौज प्रकाशनसंस्थेकडून अपेक्षित नाही! कारण मौज हा प्रकाशनविश्वातला सर्वांगीण गुणवत्तेचा मानदंड आहे. असो. ही प्रेमळ तक्रार म्हणजेसुद्धा 'मौज'विषयीच्या आदरभावाचेच द्योतक आहे.

●

**डॉ. राजा दीक्षित, पुणे**
चलभाष : ९७६७७८९५४
इ-मेल : smrajadixit@gmail.com



अनुक्रमणिका



समीक्षा

प्रा. डॉ. गणेश राऊत

# व्यापक इतिहास आणि संपादकीय मानदंडाचे उदाहरण

■■

**द्वितीय आवृत्तीचे संपादक म्हणून डॉ. राजा दीक्षित यांनी अजोड काम केले आहे. ते वृत्तीने कवी, स्त्रीवादी दृष्टिकोन असणारे शैलीदार इतिहासकार. स्वतंत्र विचारांचे आणि वृत्तीचे अभ्यासक. कुशल संपादक आणि संत वाङ्मयाचा प्रभाव असणारे लेखक म्हणून महाराष्ट्रात ख्यातकीर्त आहेत. केशवसुत आणि महाराष्ट्रातील मध्यम वर्ग यांच्यावरील त्यांचे संशोधन विद्वत वर्तुळात परिचित आहे. याच्याच जोडीला त्यांना संगीताचा कान आहे. या सगळ्याचा उपयोग त्यांना संपादनात झाला. यामुळे मराठीत एक उत्तम संपादन आकारास आले, ते म्हणजे प्रार्थना समाजाचा इतिहास- द्वितीय आवृत्ती (२०१९).**

■■

केक ग्रंथ आपले नशीब घेऊन जन्माला येतो. कोणत्या ग्रंथाचे भवितव्य काय आहे हे लेखकाला माहीत नसते. त्या ग्रंथाला न्याय मिळण्यासाठी कधी कधी वर्षे, दशक अथवा शतकही लागू शकते. असा एखादा दुर्मिळ ग्रंथ, ऐतिहासिक संदर्भांनी खच्चून भरलेला आणि त्या काळाचा साक्षीदार असणारा लेखक अशा वैशिष्ट्यांनी समृद्ध असेल, तर आणखी काय हवे? असाच एक ग्रंथ ज्याला २०२७ मध्ये शंभर वर्षे पूर्ण होणार आहेत. तो ग्रंथ म्हणजे 'प्रार्थना समाजाचा इतिहास'. त्याचे मूळ लेखक व संपादक म्हणजे द्वारकानाथ गोविंद वैद्य. ही आवृत्ती प्रार्थना समाजाने छापली होती.

या ग्रंथाला नव्वद वर्षे पूर्ण झाल्यावर प्रा. डॉ. राजा दीक्षित यांच्यासारखा कुशल संपादक लाभला आणि जणू हिऱ्याला कोंदणच मिळाले. द्वितीय आवृत्तीचे संपादक म्हणून डॉ. राजा दीक्षित यांनी अजोड काम केले आहे. ते वृत्तीने कवी, स्त्रीवादी दृष्टिकोन असणारे शैलीदार इतिहासकार. स्वतंत्र विचारांचे आणि वृत्तीचे अभ्यासक. कुशल संपादक आणि संत वाङ्मयाचा प्रभाव असणारे लेखक म्हणून महाराष्ट्रात ख्यातकीर्त आहेत. केशवसुत आणि महाराष्ट्रातील मध्यम वर्ग यांच्यावरील त्यांचे संशोधन विद्वत वर्तुळात परिचित आहे. याच्याच जोडीला त्यांना संगीताचा कान आहे. या सगळ्याचा उपयोग त्यांना संपादनात झाला. यामुळे मराठीत एक उत्तम संपादन आकारास आले, ते म्हणजे प्रार्थना समाजाचा इतिहास- द्वितीय आवृत्ती (२०१९).

द्वितीय आवृत्ती छापली ती 'एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबई'ने. 'विमल शहा स्मृती प्रकाशन निधी'मधून ही आवृत्ती आकाराला आली. अशा प्रकारची आवृत्ती तयार करण्याची मूळ कल्पना डॉ. अरुण टिकेकर या साक्षेपी संपादकांची. (ते सोसायटीचे प्रमुख असताना दुर्मिळ पुस्तके छापण्यासंदर्भात एक यादी टिकेकरांनी तयार केली. या यादीत पहिल्याच क्रमांकावर 'प्रार्थना समाजाचा इतिहास' हे पुस्तक होते. दुर्दैवाची गोष्ट म्हणजे द्वितीयावृत्ती पाहण्यास महाराष्ट्राच्या लोकसंस्कृतीचे अभ्यासक टिकेकर सर आपल्यात नाहीत. त्यामुळे या द्वितीयावृत्तीचे सगळे श्रेय एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईला आहे. महाराष्ट्रात अशी वीसच्यावर जुनी ग्रंथालये आहेत की, ज्यांना १०० वर्षे पूर्ण झालेली आहेत. त्यांनी अशा प्रकारचे ग्रंथ- संपादनाचे उपक्रम मनावर घ्यावेत.)

एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबईने द्वितीयावृत्ती काढली म्हणजे नेमके काय

■■

**प्रार्थना समाजाचा इतिहास (१९२७)**
मूळ लेखक-संपादक : द्वारकानाथ गोविंद वैद्य
द्वितीयावृत्ती संपादक : राजा दीक्षित (२०१९)
प्रकाशक : एशियाटिक सोसायटी ऑफ मुंबई
पृष्ठे : ६६२
मूल्य : ९५०/- रु.



अनुक्रमणिका








केले हे बघणे आवश्यक आहे. या संदर्भात शरद काळे (सोसायटीचे अध्यक्ष) यांनी 'दोन शब्द'मध्ये जे नमूद केले आहे, ते जे कोणी संपादन करू इच्छितात त्यांच्यासाठी मार्गदर्शक आहे. 'द्वितीय आवृत्ती तयार करताना त्यांनी संहितेच्या लेखनशैलीला धक्का न लावता व शुद्धलेखनाच्या प्रचलित पद्धतीप्रमाणे बदल न करता ती जशीच्या तशी ठेवली आहे. तथापि काही मुद्रणदोष दुरुस्ती करणे, प्रकरणांना क्रमांक देणे व जुन्या पद्धतीच्या तळटीपा त्या त्या प्रकरणांच्या शेवटी देणे, असे काही बदल संपादन करताना केलेले आहेत. मूळ छायाचित्रे तशीच ठेवून सतरा नव्या छायाचित्रांची भर घातली आहे. जुन्या मुखपृष्ठाऐवजी प्रार्थनासमाजाच्या मूळ इमारतीचे छायाचित्र असलेले आकर्षक मुखपृष्ठ करवून घेतले. याशिवाय द्वा. गो. वैद्य यांच्यावरील चरित्रपर लेखाची भर त्यांनी घातलेली आहे. प्रार्थना समाज हा केवळ 'एक बस थांबा' असल्याचा गैरसमज दूर व्हावा म्हणून १९२७ ते २०१८ या काळातील प्रार्थना समाजाच्या वाटचालीवर दृष्टिक्षेप टाकला आहे. हे सर्व करीत असताना त्यांनी एकूण चारशे पासष्ट तळटीपा दिलेल्या आहेत.''

अध्यक्षांचे निवेदन वाचल्यावर आपल्याला असे वाटेल की, हे खूपच सोपे काम आहे; परंतु साधनांची अनुपलब्धता हा महाराष्ट्राला शाप आहे. याची जाणीव हे निवेदन वाचताना होते. श्री. काळे नमूद करतात, ''प्रार्थनासमाजाच्या ऐतिहासिक साधनांचे बरेचसे अभिलेख गहाळ झाल्यामुळे निराश न होता त्यांनी (डॉ. दीक्षित) उर्वरित साधने अभ्यासली व परिश्रमपूर्वक इतर ठिकाणांहून व काही व्यक्तींकडून अधिक साधने प्रयत्नपूर्वक मिळविली... १९३५ व १९३८ सालची दोन मौलिक हस्तलिखिते मिळवून या अप्रकाशित मूळ साधनांचा वापर यात प्रथमच करण्यात आला आहे. प्रार्थना समाजाचे मुखपत्र असलेल्या 'सुबोध पत्रिके'चे तीनशे-सव्वा तीनशे अंक. १८९२मध्ये सुरू झालेल्या 'कामगार' या नियतकालिकाचे त्या वर्षाचे अंक, १८९५मध्ये मराठीत छापलेले सत्येंद्रनाथ टागोरांचे प्रार्थना समाजातील भाषण अशी अनेक मूळ साधने अभ्यासली.'' अशी सगळी पार्श्वभूमी लक्षात घेतल्यावरच ग्रंथाच्या अंतरंगात प्रवेश करायला हवा. तत्पूर्वी संपादकांच्या कृतज्ञताबुद्धीला दाद द्यायला हवी कारण ग्रंथ डॉ. टिकेकर यांच्या स्मृतीस अर्पण केला आहे.

'संपादकाचे मनोगत' या आठ पृष्ठांमध्ये डॉ. दीक्षित यांनी आपल्या वाचकांशी जणू संवादच साधला आहे. मूळच्या क्राऊन साइजमधील सातशे पानी पुस्तकात नव्या शंभर-दीडशे पानांची भर पडणार असल्याने पुस्तक मोठ्या आकारात छापण्याचे ठरविले, असे संपादकांनी नमूद केले आहे. 'वाचनसौकर्य' हा शब्द खूप दिवसांनी वाचनात आला. असे वेगवेगळे शब्द वापरण्यात आणि 'इतिहासाचे अपहरण' असे शब्द घडविण्यात डॉ. दीक्षित यांचा हातखंडा आहे. ते आपल्याला ग्रंथात अनेक ठिकाणी जाणवते. त्यांनी काय बदल केले हे त्यांच्याच शब्दांत समजून घेऊ यात.

''...नजरचुकीने राहून गेलेले अगदी उघड, असे काही मुद्रणदोष दुरुस्त केले. ग्रंथाच्या प्रथमार्धातील प्रकरणांना क्रमांक नव्हते. मजकूर सलग छापल्याने एक प्रकरण संपून दुसरे सुरू झाल्याचे समजण्यात अडचणी येत होत्या. (त्या बदलल्या) एका अगदी छोट्या प्रकरणाचा नजरचुकीने राहिलेला उल्लेख नव्या अनुक्रमणिकेत मात्र केलेला आहे.'' अशा अनेक गोष्टी संपादकांनी नमूद केलेल्या आहेत. सगळ्याच जागेअभावी देणे शक्य नाही; परंतु आवश्यक त्या गोष्टींचा येथे उल्लेख केलेला आहे.

वरील गोष्टी ग्रंथाच्या बाह्यांगाला पूरक आहेत. संपादकांनी अंतरंगात काय बदल केले ते समजून घेणे आवश्यक आहे. मूळ ग्रंथ प्रसिद्ध होऊन नऊ दशके उलटली आहेत. काही संदर्भ साधने जशी नष्ट झाली तशी काही साधने नव्याने सापडू शकतात. इतिहासकाराला हाताशी उपलब्ध असणाऱ्या जुन्याच साधनांचा नव्याने अर्थ लावावा लागतो. लिखित मजकुराच्या मागील अर्थ शोधावा लागतो. शब्दांच्या पलीकडचे समजून घ्यावे लागते. दीक्षित यांचे अभिनंदन येथे अशासाठी करावे लागते की, त्यांनी मूळ आवृत्तीत नसलेली मोठी भर घातली. ती म्हणजे द्वा. गो. वैद्य यांच्यावर त्यांनी स्वतंत्र बावीस पृष्ठांचा लेख लिहिला आहे. हे करताना त्यांनी आदरभाव आणि कर्तव्यकर्म यांची गल्लत न करता योग्य ती सांगड घातली आहे. याचे एकमेव कारण म्हणजे ज्ञानाचा प्रवाह खळाळता राहिला पाहिजे. हा प्रवाह खळाळता ठेवायचा असेल, तर पूर्वजांच्या त्रुटींवर मात करून आधुनिकतेशी सुसंगत ज्ञानप्रवाह ठेवावा लागतो. हे

शिवधनुष्य संपादकांनी पेलले आहे. संपादकांनी काही संदिग्ध तपशील दुरुस्त केलेले आहेत. पहिल्या संपादकांनी मूळ आवृत्तीत काही गोष्टी गृहीत धरल्या होत्या. उदाहरणार्थ मूळ पुस्तकात नुसता 'केतकर' असा उल्लेख आहे. या 'केतकर' आडनावाचा शोध घेऊन सावरकरांच्या कवितेच्या आधारे संपादकांनी केतकरांना योग्य तो न्याय दिला आहे.

**स्त्रीवादी दृष्टिकोन :**

या ग्रंथाचे मोल संपादकांच्या आणखी एका दृष्टिकोनामुळे वाढले आहे. संपादकांचा स्त्रीवादी दृष्टिकोन आवश्यक तेथे आढळून येतो. मूळ आवृत्तीत वैद्यांकडून प्रार्थना समाजातील स्त्रियांची कामगिरी दुर्लक्षित राहिली आहे. यात वैद्यांना दोष देण्यात अर्थ नाही कारण आजही इतिहासाच्या पाठ्यपुस्तकातसुद्धा स्त्रियांची कामगिरी अदृश्यच असते. आताशा एकविसाव्या शतकात परिस्थिती थोडीशी बदलत चालली आहे. द्वितीय आवृत्तीच्या संपादकांनी पूरक तळटीपा, पुरवणी-लेख यांद्वारे ही उणीव भरून काढण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. उदा. आर्य महिला समाज आणि डॉ. काशीबाई नवरंगे यांच्या कामगिरीवर प्रकाश टाकण्यात आला आहे. 'लेडी लक्ष्मीबाई नारायण चंदावरकर आणि आर्य महिला समाज' ही माहिती इतिहासाच्या पाठ्यपुस्तकात नाही, ती येथे आली आहे. पद्मभूषण ताराबाई मोडक यांच्या आई-वडिलांच्या आंतरजातीय विवाहासंदर्भातील माहिती वाचकाच्या ज्ञानात भर घालते. गुलाबचंद रतनचंद, शांताबाई खरे यांना संपादकांनी प्रार्थना समाजाच्या इतिहासाच्या संदर्भात योग्य तो न्याय दिला आहे. भोलानाथ साराभाई आणि लोकहितवादी यांच्या मुलींचा अहमदाबाद प्रार्थना समाजाच्या कार्यात सहभाग होता. १८७४ मध्ये चाळीसहून अधिक स्त्रिया या समाजाच्या 'स्त्री-सभे'च्या सभासद होत्या. या स्वरूपाची माहिती आधुनिक महाराष्ट्र आणि भारताच्या इतिहासाच्या आकलनात भर घालते. आणखी एक उदाहरण म्हणजे विद्यागौरी नीलकंठ आणि शारदाबेन मेहता या गुजरातमधील पहिल्या दोन पदवीधर स्त्रिया अहमदाबादच्या प्रार्थना समाजी कुटुंबातील होत्या. यातून प्रार्थना समाजाचे महत्त्व अधोरेखित होते. वाई येथील ब्राह्म समाजाच्या अध्यक्षा डॉ. प्रियंका सावळे यांचाही कृतज्ञतापूर्वक उल्लेख आहे. या सगळ्यांची नोंद एवढ्यासाठीच घेतली की, वैद्य यांनी जे अठरा चरित्रात्मक लेख लिहिले आहेत, त्यात एकही स्त्री नाही. सर्वच लेख पुरुषांवर आहेत. अशा वेळेला दीक्षित यांनी 'स्त्रीपुरुषसमानता' मुद्दा लक्षात घेऊन जेथे जेथे शक्य आहे तेथे तेथे स्त्रियांच्या कर्तृत्वाची नोंद घेऊन पहिल्या आवृत्तीतील मोठी उणीव दूर केली आहे. प्रस्तुत लेखाच्या शब्दमर्यादेमुळे ग्रंथातील सगळीच उदाहरणे घेता आली नाहीत.




**संत वाङ्मय प्रभाव**

या संपादनात डॉ. दीक्षित यांच्यावरील संत वाङ्मयाचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. 'संपादकांचे मनोगत' यात त्यांनी संत तुकाराम महाराजांचा अभंग उद्धृत केला आहे. 'द्वितीयावृत्तीची प्रस्तावना' या भागाची सुरुवातच त्यांनी न्या. रानडे यांच्या आवडत्या अभंगानी केली आहे. शेवट ज्ञानेश्वरीतील ओवीने केला आहे. प्रकरण एकोणिसावे सुबोध पत्रिका (सत्यमेव जयते) यात तळटीपांमध्ये संपादकांनी महात्मा फुले यांच्या 'अखंड'चा अचूक संदर्भ दिला आहे. या अखंडामुळे मोरो विठ्ठल वाळवेकर (नीलदर्पणचे भाषांतरकार) यांच्या कारकिर्दीवर प्रकाश पडला आहे. प्रार्थना समाजाचे कार्यकर्ते आणि सुबोध पत्रिकेचे संपादक अशा दुहेरी भूमिकेत वावरणाऱ्या वाळवेकर आणि महात्मा फुले यांच्या मैत्रीवर प्रकाश टाकणारा हा अखंड आहे. या अखंडाच्या माध्यमातून संपादकांनी शोधनिबंधाची एक वाट खुली केली आहे. वामन आबाजी मोडक यांच्यावरील लेखाच्या तळटीपेत शारदा सदनाच्या स्थापन प्रसंगी म्हणण्यासाठी पंडिता रमाबाई यांच्या विनंतीवरून मोडक यांनी रचलेले गीत (इ.स. १८८८) दिले आहे. ते शोधून वाचकांना देण्यासाठी द्वितीय आवृत्तीच्या संपादकांनी

घेतलेले परिश्रम मोलाचे आहेत. स्वतः संपादकांनी द्वा. गो. वैद्य यांच्यावरील लेख लिहिला आहे. त्याच्या सुरुवातीला संत एकनाथ महाराजांचे वचन दिले आहे. पुढचा अध्याय (१९२७-२०१८) : दृष्टिक्षेप या प्रकरणाचा शेवट संत तुकाराम महाराजांच्या वचनाने केला आहे.

वरील उदाहरणे एवढ्यासाठीच दिलेली आहेत की, संपादकांवर असणारा संत वाङ्मयाचा प्रभाव आपल्या लक्षात यावा. कित्येकदा संत वचनांच्या वापरामुळे आपणास जे काही सांगायचे आहे ते एक-दोन ओळीत सांगता येते. त्यासाठी फाफटपसारा देण्याची गरज नाही. संत वचनांचा वापर संपादकांची ओघवती शैली दाखवून देते. अन्यथा संतवचनांचा अतिरेकी वापर हास्यास्पद होतो. नको तेथे संत वचने वापरली तरी ग्रंथ स्वतःचे मूल्य हरवून बसतो. संपादकांनी प्रथम आवृत्तीच्या शैलीस पूरक अशीच शैली संतवचनांच्या माध्यमातून पुढे नेली आहे. महर्षी वि. रा. शिंदे यांच्या प्रेरणेने प्रार्थना समाजाचे वाई येथील कार्य विस्तारित झाले, त्याला योग्य तो न्याय संपादकांनी दिला आहे.

**संपादकांचे योगदान**

एखाद्या जुन्या ग्रंथाला संपादित करून नव्याने दुसरी आवृत्ती सिद्ध करताना त्या ग्रंथास चारशे पासष्ट टीपा देण्याचा विक्रम गेल्या कित्येक वर्षांत झाला नसावा. डॉ. दीक्षित यांच्या चारशे पासष्ट टीपांमध्ये कितीतरी शोधनिबंधांचे विषय, एम. फील.-पीएच.डी.चे विषय दडले आहेत. त्या विषयांचा शोध घेऊन त्यावर संशोधन करण्यासाठी नव्या तरुण पिढीने पुढे येणे आवश्यक आहे. महाराष्ट्रातील सर्वच इतिहास विषयाच्या शिक्षकांनी-प्राध्यापकांनी हा ग्रंथ वाचणे आवश्यक आहे. हा ग्रंथ महाराष्ट्रातील प्रत्येक शाळेत आणि ग्रंथालयात जाणे गरजेचे आहे. स्पर्धा परीक्षांचे विद्यार्थी, पत्रकार, अभ्यासक आणि संशोधक यांना एकोणिसाव्या - विसाव्या शतकातला महाराष्ट्र समजून घ्यायचा असेल, तर या ग्रंथाचे वाचन-चिंतन-मनन होणे आवश्यक आहे. उपलब्ध साधनांचा अर्थ लावण्याची आंतरविद्याशाखीय पद्धती यावर दीक्षितांची विलक्षण पकड आहे. इतिहासाचे समाजशास्त्र याबाबतीत दीक्षितांची बरोबरी करणारा इतिहासकार विरळाच. नवे-नवे शब्द घडविण्याची त्यांची ताकद, एकाच वाक्यात संपूर्ण कालखंड उभा करण्याची त्यांची ताकद विलक्षण आहे. द्वा. गो. वैद्य यांच्यावरील लेख त्यांनी वैद्य यांच्याच शैलीत लिहिला आहे. या दृष्टीने 'या हृदयीचे त्या हृदयी' लेखन कसे असू शकते याचा ओनामाच डॉ. दीक्षित यांनी दाखवून दिला आहे.

सेवापरायण घराणेशाही, वाचनसौकर्य, ऐतिहासिक साक्षरता, अतिरिक्त ताणापायी शरीर मात्र अगदी 'पंक्चरले', 'ऐतिहासिक स्पर्श', 'घडणाऱ्या आणि लिहिल्या जाणाऱ्या अशा दोन्ही प्रकारच्या इतिहासाला पूर्णविराम नसतो.' संघर्षशील समाजकार्य, अंतरी निर्मत्सर, स्वीकृत पारिग्र, रावसाहेबी उच्चासनावरून सांगितलेला आणि जोपासलेला समतावाद अशा स्वरूपाची शब्दसंपत्ती आणि वाक्ये यांमुळे ग्रंथ वाचनीय झाला आहे. संपादकांचे भाषेवर प्रभुत्व असल्याखेरीज असे नवे नवे शब्द, अर्थवाही वाक्ये तयार करता येत नाही. भाषेच्या अभ्यासकांनी या दृष्टिकोनातून या ग्रंथाचा अभ्यास करायला हरकत नाही. एकाच वेळी आपणास एकोणीस-वीस-एकविसाव्या शतकातील मराठीचे बदलते रूप या ग्रंथात बघायला मिळते.

**संशोधन पद्धती :**

संपादकांनी या ग्रंथासाठी जी साधने वापरली आणि जी संशोधन पद्धती वापरली तिची दखल घेणे आवश्यक आहे. संपादकांनी प्रार्थना समाजाविषयी एक पोस्ट फेसबुकवर टाकली होती. ती वाचून नाशिक येथील ॲडव्होकेट मिलिंद चिंधडे यांनी उपयुक्त माहिती कळवली. त्यांचे सासरे श्री. रमाकांत तांबोळी हे प्रार्थना समाज संचलित पंढरपूर बालकाश्रमाचे अधीक्षक होते. संपादकांनी त्यांची दीर्घ मुलाखत घेतली. ती ग्रंथास उपयुक्त ठरली. सोशल मीडियाचा असाही एक चांगला वापर.

दुसरे उदाहरण म्हणजे 'शैला मुकुंद (आठवले) या ख्यातनाम सूत्रसंचालक आहेत. संपादक एकदा त्यांच्याशी फोनवर बोलत असताना प्रार्थना समाजाचा विषय निघाला. द्वा. गो. वैद्यांचे समकालीन प्रार्थना समाजी बलभीमराव तथा बी. बी. केसकर शैला मुकुंद यांचे आईकडून नातेवाईक. त्यांच्या वंशजांकडून पाचशे फुलस्केप पानांचे बाड मिळाले. हा साधन संग्रह प्रथमच वापरण्यात आला आहे. अनेकदा चांगल्या कामाविषयी बोलत राहिल्यामुळे काय-काय होऊ शकते याचे हे उदाहरण आहे. नुसत्या 'केतकर' या

अनुक्रमणिका

आडनावाचा शोध घेताना स्मरणात राहिलेली कविता या गोष्टींनी दीक्षित हे अन्य संशोधकांपेक्षा उजवे ठरतात. बाकी प्राथमिक, दुय्यम, पारंपरिक, अपारंपरिक साधने त्यांनी भरपूर वापरली आहेत.

नुसती साधने उत्तम असून चालत नाहीत, तर त्याचा अन्वयार्थ कसा लावायचा हे महत्त्वाचे. या दृष्टीने एकच उदाहरण देतो. पृ. ६१०वर सुलभा पाणंदीकर यांच्याविषयी तळटीप दिली आहे. ती वाचताना वाचक थक्क होतो. एका छोट्याशा संदर्भावरून संपादकांनी जी झेप घेतली आहे आणि संदर्भ वापरले आहेत ते थक्क करणारे आहे. अशाच प्रकारची माहिती श्रीमती चित्रा नाईक, रमाबाई नवरंगे, कु. कृष्णाबाई जव्हेरे यांच्या संदर्भात मिळते. या स्त्रियांचा प्रार्थना समाजाशी असणारा संबंध यांवर संपादकांनी प्रकाश टाकला आहे. आजवर अशी माहिती दुर्लक्षित (न छापण्यायोग्य किंवा अन्य काहीही कारणे असोत) राहिली होती. ती या निमित्ताने पुढे आली. सूचीमध्ये किमान शंभर पेक्षा जास्तच स्त्रियांचे उल्लेख आलेले आहेत. प्रार्थना समाजाशी त्यांचे असणारे नाते या विषयावर एक ग्रंथ होऊ शकेल. कविता भालेराव यांनी ग्रंथासाठी योग्य ती सूची तयार केली आहे. संपादकांनी स्वतःच्या विद्यार्थिनींसह ज्यांची ज्यांची मदत ग्रंथासाठी झाली त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली आहे. अलीकडे हे दुर्मिळ झाले आहे.

**योगदान :**

आता लेखाच्या शेवटच्या भागाकडे येऊयात. संपादकांनी या ग्रंथासाठी काय मेहनत घेतली हे त्यांच्याच शब्दांत वाचूयात. ''...किमान सहा-सात महिने तरी मी स्थानबद्ध व अज्ञातवासी होतो. इतर सर्व कामे व उपक्रम बंद ठेवून मी एक कार्यमग्न घरकोंबडा आणि बौद्धिक निशाचर बनलो! घड्याळाला सुट्टी देऊन टाकली! असो. ही कठोर तपश्चर्या संपवताना मनात खूप समाधान आहे. बा. सी. मर्ढेकरांचा शब्दप्रयोग वापरायचा, तर अतिरिक्त ताणापायी शरीर मात्र अगदी 'पंक्चरले' आहे! कालांतराने येईल ते जागेवर. निवृत्तीनंतरच्या काळात स्वतःच्या शारीरिक क्षमतांविषयी मी शंका घेऊ लागलो होतो; पण निश्चयाच्या बळावर मी अजूनही किती काम करू शकतो याचा या संपादनामुळे झालेला साक्षात्कार, हे केवढे मोठे बक्षीस आहे.... तात्त्विकदृष्ट्या इतिहास-संशोधनाला पूर्णविराम नसतो! त्यामुळे द्वा. गो. वैद्यांपासून माझ्यापर्यंत सुरू असलेली ही शोधयात्रा या पुढेही चालू राहील.''

खऱ्या अभ्यासकाची खरंच नम्र भूमिका अशीच असते. खरं म्हणजे डॉ. दीक्षित यांनी हा ग्रंथ स्वतंत्रपणे रचला असता, तर त्याला साहित्य अकादमीचाच सन्मान मिळाला असता.

ग्रंथात मूळ आवृत्तीचे एक छायाचित्र घ्यायला हरकत नव्हती. सूचीमध्ये काही लोकांची जन्मतारीख दिली आहे ती का? याचा उलगडा होत नाही. ब्रिटिश काळातील अधिकार पदे वा पदव्या यांची पूर्णरूपे सामान्य वाचकासाठी देणे आवश्यक होते. काही माहितीचा अर्थ लागत नाही. (उदा. पृ. १४ वरील मिशनरी आणि शिक्षणाच्या संदर्भातील तक्ता) तळटीपेत मूळ आवृत्तीतील इंग्रजी संदर्भांचे विशेषतः सविस्तर टीपांचे मराठी भाषांतर दिल्यास वाचकांची अधिक चांगली सोय झाली असती. पृ. ८७ वरील छायाचित्राखाली कॅप्शन आवश्यक, सूचीमध्ये पृ. ६२१ वर आठल्ये (महाराष्ट्र भाषाचित्तमयूर) एवढीच नोंद आहे. त्यात आठल्ये यांचे पूर्ण नाव देणे आवश्यक होते. अशा किरकोळ त्रुटी वगळल्यास ग्रंथाचे संदर्भमूल्य वाढविण्यासाठी डॉ. राजा दीक्षित यांनी घेतलेले परिश्रम अफाट आहेत. मलपृष्ठावर त्यांचा फोटो प्रकाशकांनी स्वतः निर्णय घेऊन छापला असता, तर संपादकांना अधिक न्याय मिळाला असता. कदाचित द्वितीय आवृत्तीच्या प्रत्येक पृष्ठावर संपादकांचा ठसा उमटलेला असल्यामुळे फोटो छापला नसावा. महाराष्ट्राच्या वाङ्मयीन इतिहासात द्वितीय आवृत्ती चिरंतन टिकणारी कलाकृती झाली आहे एवढे निश्चित!

●

प्रा. डॉ. गणेश राऊत
चलभाष : gdrauthistory@gmail.com
इ-मेल : ८४५९७७२०१८













पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ. उमेश मारूती सिरसट

# ऋतुपर्व : प्रेमाचा उत्कट आविष्कार

■■

**कवी प्रेमभावना व्यक्त करत असताना बदलत्या काळाचेही संदर्भ सोबत घेऊन येतो आहे. बदलत्या काळामुळे, आलेल्या यांत्रिकीकरणामुळे, सोशल मीडियामुळे नाती हरवलेली आहेत. प्रेमभावना, आपुलकीचा पत्रव्यवहार नष्ट होत आहे. घरात यंत्र आल्यापासून माणसे यंत्र झाली आहेत. त्यामुळे आपापसांत संवाद होत नाही, याची खंत कवीमनाला आहे. म्हणूनच कवी सगळ्या ग्रुपवरून डिलिट होण्याची भाषा करतो आहे.**

■■

ऋतुपर्व
शशिकांत हिंगोणेकर
सुविद्या प्रकाशन, पुणे
पृष्ठे - २४०
किंमत : ३००/- रु.



शशिकांत हिंगोणेकर यांचे आजपर्यंत चौदा कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. 'ऋतुपर्व' हा त्यांचा चौदावा कवितासंग्रह आहे. इतर कवितासंग्रहाप्रमाणेच याही कवितासंग्रहामधून त्यांनी प्रेमाच्या विविध छटा टिपण्याचे काम केले आहे. या कवितासंग्रहात प्रेमाचा उत्कट आविष्कार पाहायला मिळतो. कवीच्या मनातील तरल, कोमल, संवेदनशील प्रेमभावनेची सेंद्रिय एकात्मता कवितेत व्यक्त झाली आहे.

कवीच्या मनातील 'ती' (प्रेयसी) ही कवितेच्या केंद्रावर आणि परिघावर अशाप्रकारे व्यक्त झाली आहे की, त्यातून 'ती'ला वेगळे काढता येत नाही. कवीच्या तळघरात म्हणजेच नेणिवेत 'ती' घर करून बसली आहे. विविध आठवणींच्या माध्यमातून ती प्रतिमा-प्रतीकांच्या रूपात व्यक्त होऊ पाहते आहे. फुले, झाडे, पक्षी अशा विविध प्रतिमांतून या आठवणींना उजाळा मिळतो आहे.

*''कुठला तरी एक पक्षी*
*घरटे बांधून राहत होता*
*झाडाच्या काळजात...''* (झाड, पृ. २२)

'ती'च्या बद्दलच्या अनेक आठवणी कवीच्या नेणिवेत पडून आहेत. त्या आठवणी प्रतिमा-प्रतीकांच्या माध्यमातून कवितेत व्यक्त होत आहेत.

*''एकेक दिवस*
*आठवणीत जमा होतोय*
*आठवणींचेच झालेय आयुष्य''* (आयुष्य, पृ.३४)

'ती'च्या आठवणींनी कवीचे सर्व आशयविश्व व्यापून टाकले आहे. 'ती' कवीच्या कवितेचे प्राणतत्त्व झाली आहे. ही प्रेमभावना व्यक्त करताना कवी म्हणतो,

*''तुझ्याशिवाय कविता*
*जन्मच नाही होऊ शकत*
*किंबहुना पहिली कविता*
*ही तुझाच जन्म असते.''* (श्वास, पृ.७४)

कवीला 'ती'ची सोवत, साथ सतत आहे. 'ती' त्याच्या जगण्याचा केंद्रबिंदू आहे. कवितेचे आशय आणि आविष्कार विश्व तिच्यामुळे व्यापक आणि व्यामिश्र झाले आहे. तिची सोवत ऊर्जादायी आहे.



अनुक्रमणिका








*''तुझे माझ्यासोबत असणे*
*उर्जाच असते माझ्यासाठी''* (ऊर्जा, पृ. २३८)

या उर्जेच्या साहाय्याने कवी नव्या दमाने व्यक्त होतो आहे. 'ती' ही त्याच्या जीवनाची संजीवनी आहे. 'ती' त्याच्या जगण्याची, प्रेमाची उत्कट अभिव्यक्ती आहे. तिच्यामुळेच त्याच्या जगण्याला अर्थ प्राप्त झाला आहे. त्याच्या जीवनात नवे ऋतुपर्व आले आहे. जीवनाची आणि जगण्याची नवी क्षितिजे कवीला आता दिसू लागली आहेत. तिच्यामुळे कवीच्या जगण्यात चैतन्य निर्माण झाले आहे.

*''तुझ्यामुळेच*
*माझ्या जगण्याला*
*आता नवे धुमारे फुटताहेत''* (धुमारे, पृ. २४०)

'ऋतुपर्व' संग्रहामधून जशी प्रेमभावना व्यक्त झाली आहे, तशीच 'ती'च्या विरहाची, ओढीची, प्रतीक्षेची आणि प्रेमपूर्तीच्या आतुरतेची उत्कटता व्यक्त झाली आहे.

*''तुझ्या एका अबोल्याने*
*अवघडच झालेय सगळे*
*मी काय करावे म्हणजे*
*पुन्हा उगवतील*
*संवादाची फुले...''* (संवादाची फुले, पृ. ३७)

'कुछ भी तो नही' या कवितेत कवीच्या मनातील आंतरिक वेदना चित्रित झाली आहे. ही वेदना कारुण्याने ओतप्रोत भरलेली आहे.

*''मी उदास तुझ्या*
*आठवणीत*
*हरवलेला''* (कुछ भी तो नही, पृ. १३३)

हा उदास झालेला प्रियकर तिच्या आठवणीत हरवलेला आहे. त्यामुळे त्याचे अंतःकरण कारुण्याने भरून गेले आहे; परंतु तो जेव्हा तिच्या मनाच्या तळघरात उतरतो तेव्हा तो तिला काळजाचा दरवाजा उघडा ठेव अशी आर्जवं करतो आहे. हा प्रेमवीर तिच्या प्रेमप्राप्तीसाठी आतुर झाला आहे.

*''उतरलोच आहे*
*आहे तुझ्या मनाच्या*
*तळघरात तर...*
*तू लावू नकोस*
*काळजाचा दरवाजा''*

(मनाच्या तळघरात, पृ. ५१)

हाच प्रेमवीर पुढे किनारा बनून तिची प्रतीक्षा करतो आहे. आपल्या विरह तप्त मनाला तिने लाट बनून तृप्त करावे. त्या प्रेमलाटेत आपण चिंब भिजावे असे त्याला वाटते आहे.

*''मी मात्र किनारा बनून*
*तुझ्या प्रतीक्षेत जगतोय*
*तू होता माझ्या काळजाला*
*चिंब भिजवणारी लाट''*

(नव्या दमाने, पृ.५७)

प्रियकराची ही प्रेमप्रतीक्षेची भावना एका अंतिम टोकाला जाऊन पोहोचली आहे. ही प्रेमप्रतीक्षेची वेदना जीवघेणी ठरत आहे.

*''प्रतिक्षेच्या ऋतूतच*
*हरवलोय मी...*
*अजूनही संपली नाही*
*माझी जीवघेणी प्रतिक्षा''* (लाटेसारखा, पृ. ६२)

प्रियकराची अशी जीवघेणी ओढाताण होत असली तरी तो समंजस आहे. त्याला विश्वास आहे की, हा काळ बदलेल. त्याला विश्वास आहे, तिच्या नुसत्या एका शब्दाने ऋतुपरिवर्तन होणार आहे.

*''तिच्या एका शब्दाने*
*माझ्या मनाचा पारिजात बहरला*
*आणि मौनाचा काळा*
*ऋतूच गळून पडला...''*

(तिच्या एका शब्दाने, पृ.४४)

अशाप्रकारे कवितेतून प्रेमाची उत्कटता अधोरेखित झाली आहे. ऋतुचक्रामुळे निसर्गाच्या लावण्याला बहर येतो. त्याचप्रमाणे प्रेमचक्रातील विविध ऋतूंमुळे प्रेमाला बहर येतो. विरह, ओढ, आशा, निराशा, प्रतीक्षा, आतुरता, मिलन अशा विविध प्रेमऋतूंमुळे प्रेमचक्र विविधरंगी होत जाते. कवितेतील प्रियकराला आपल्या प्रेमावर विश्वास आहे. तिच्या सोबतीने प्रियकर आयुष्याच्या आणि प्रेमाच्या ऋतुपर्वाचं स्वागत करतो आहे.

*''अजूनही संपला नाही प्रवास*
*अजूनही अवघड आहेत रस्ते*
*हे सारे अवघड घाट*
*करूया सारेच सपाट*
*येणाऱ्या नव्या पिढीसाठी...*
*नव्या ऋतूंच्या स्वागतासाठी...''*



अनुक्रमणिका

(नव्या ऋतूंच्या स्वागतासाठी, पृ.४६)

'ऋतुपर्व' कवितासंग्रहामधून आशावादही व्यक्त झाला आहे. कवीचा प्रेमावर विश्वास आहे. काळानुसार प्रेमाचा ऋतूही बदलेल. त्याला चैतन्याची नवी धार चढेल, प्रेमाला नवा बहर येईल, असा आशावाद कवितेतून व्यक्त होताना दिसतो आहे.

*''लवकरच ऋतू बदलतील*
*पुन्हा आपले ऋतू येतील*
*तुझे- माझे*
*ऋतूपर्व पुन्हा*
*बहरेल नव्याने*
*नक्कीच...''* (पुन्हा नव्याने, पृ. १८०)

कवी ह्या प्रेमभावना व्यक्त करत असताना बदलत्या काळाचेही संदर्भ सोवत घेऊन येतो आहे. बदलत्या काळामुळे, आलेल्या यांत्रिकीकरणामुळे, सोशल मीडियामुळे नाती हरवलेली आहेत. प्रेमभावना, आपुलकीचा पत्रव्यवहार नष्ट होत आहे. घरात यंत्र आल्यापासून माणसे यंत्र झाली आहेत. त्यामुळे आपापसांत संवाद होत नाही, याची खंत कवीमनाला आहे. म्हणूनच कवी सगळ्या ग्रुपवरून डिलिट होण्याची भाषा करतो आहे.

एकूणच, 'ऋतुपर्व'मधील कविता उत्कट प्रेमभावना व्यक्त करते. ही कविता वाचकांना आनंद देणारी आहे. प्रेमाच्या विविध छटांचा सूक्ष्मपातळीवरील वेध कवितांमधून घेण्यात आलेला आहे. या कवितांमधून समंजस प्रियकर, तरल, कोमल, उत्कट प्रेमभावना, स्वप्नांचा नवा प्रदेश, प्रेमाचा, विरहाचा, प्रतीक्षेचा, विश्वासाचा, नव्या ऋतुपर्वाचा प्रदेश चित्रित झाला आहे. साध्या-सोप्या भाषेतील लेखनशैलीमुळे ही कविता वाचकांच्या मनाचा ठाव घेते. ही प्रेमकविता हळुवारपणे वाचकांच्या अंतर्मनात उतरते आणि नेणिवेतील प्रेमाच्या अनुभवांना स्पर्श करते. काही कवितांमध्ये आशयाची, आणि शब्दांची पुनरावृत्ती झाली आहे. त्यामुळे कवितेत साचेबंदपणा आल्यासारखा वाटतो. हा अपवाद वगळता कवितेतून प्रेमाची उत्कट भावना व्यक्त झालेली आहे.

●

**प्रा. डॉ. उमेश मारूती सिरसट**
अण्णासाहेब आवटे कॉलेज, मंचर
चलभाष : ९६५७१५९५१५









पुस्तक परीक्षण

डॉ. हरेश शेळके

# वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून संत चरित्रात्मक कादंबरीचे मूल्यमापन करणारा दिशादर्शक ग्रंथ

हाराष्ट्राला संस्कृती, संप्रदाय, पंथ, लोकसाहित्य, संगीत, चित्रकला, शिल्पकलेच्या वैविध्यपूर्ण परंपरा दीर्घकाळापासून लाभलेल्या आहेत. यांतील काही परंपरा सातत्याने समाजहित जोपासताना समाजाचे प्रबोधन करत आहेत. या परंपरांचे दिशादर्शक असे योगदान आजही आपणास पाहावयास मिळते. या पार्श्वभूमीवर राजेंद्र थोरात यांचा 'वारकरी संत चरित्रात्मक कादंबरी' हा ग्रंथ साहित्यविश्वात प्रकाशित होणे म्हणजे अभ्यासक, संशोधक आणि वाचक यांना एक प्रकारचे दिशादर्शन आहे. या ग्रंथाची दोन ठळक वैशिष्ट्ये सुरुवातीला नोंदवता येतील, जी संशोधन समीक्षेच्या दृष्टिकोनातून मला महत्त्वाची वाटतात. पहिले प्रधान वैशिष्ट्य म्हणजे या ग्रंथातील लेखनात भावनिकता, श्रद्धाळू वृत्तीपेक्षा वस्तुनिष्ठतेवर अधिक भर आहे. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे संदर्भ अतिशय मोजके; परंतु अचूक दिलेले असल्यामुळे ग्रंथ वाचनीय झाला आहे. विशेष म्हणजे मोजके संदर्भ, प्रसंग, घटना, वर्णने, संरचना, शीर्षक, मुद्दे, उपमुद्दे, विश्लेषण या सर्व घटकांची मांडणी वाचक संशोधकांना नवी दृष्टी देणारी आहे. पीएच.डी. प्रबंधातील काही आशयावर हा ग्रंथ असूनही लेखकाने हा ग्रंथ लिहिताना योग्य आशय व योग्य संदर्भ देऊन संशोधनाला व्यासंगाची जोड दिली आहे.

महाराष्ट्राचे आराध्य दैवत पंढरपूरच्या पांडुरंग चरणी विनम्रतेने राजेंद्र थोरात यांनी हा ग्रंथ अर्पण केला आहे. या अभ्यासपूर्ण ग्रंथाची राजेंद्र थोरात यांनी एकूण पाच प्रकरणांमध्ये विभागणी केली आहे. संत चरित्रात्मक कादंबरीच्या प्रेरणा, वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीचे स्वरूप, वारकरी संत दर्शन, वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीतील समाजचित्रण, वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीची ऐतिहासिकता अशा पाच प्रकरणांतून मांडणी केली आहे. पाचही प्रकरणे वाचनीय व अभ्यासपूर्ण आहेत.

'संत चरित्रात्मक कादंबरीच्या प्रेरणा' या पहिल्या प्रकरणात चरित्र, चरित्रात्मक कादंबरी, चरित्र नायक, संस्कृती, वारकरी संतांची माणूसधर्माची शिकवण यांविषयीचे विवेचन सविस्तरपणे आले आहे. वाचकांना संतविषयक समृद्ध अशा चरित्र वाङ्मयाची माहिती या विवेचनातून मिळते. सदर लेखकाने या प्रकरणात चरित्र कादंबरीविषयी सखोल विवेचन केल्यामुळे संशोधक वाचकांच्या दृष्टीने हे प्रकरण उपयुक्त आहे. जाणकार समीक्षकांचे संदर्भ वाचकांच्या व संशोधकांच्या ज्ञानात, आकलनात भर टाकतात. नव अभ्यासक व संशोधकांना संशोधनाचे नवपरिप्रेक्ष अधोरेखित होण्याच्या दृष्टिकोनातून पहिलेच प्रकरण दिशादर्शक आहे.

'वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीचे स्वरूप' या प्रकरणात संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम इत्यादी संतांच्या जीवनावरील कादंबऱ्यांचे सविस्तर विश्लेषण केले आहे. संत मुक्ताई, संत चोखोबा, संत जनाबाई, संत सेना, संत निळोबा इत्यादी... वारकरी संतांच्या जीवनावरील कादंबऱ्यांचे नेमकेपणाने विश्लेषण केले आहे. या प्रकरणातून वारकरी संतांचा जीवनप्रवास, जीवन संघर्ष, जगण्याचे तत्त्वज्ञान आणि त्यांचे 'अक्षर' साहित्य यांचा एक सात्त्विक आलेख वाचकांच्या डोळ्यासमोर उभा राहतो. संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम यांच्या जीवनविषयक ऐकीव माहिती खूप ऐकलेली असते. वारकरी संतांचे काही अभंग आपल्याला तोंडपाठ असतात. कथा-कीर्तनातून संतांचे पारंपरिक चरित्र भाविकतेने कथनात्मक स्वरूपात येत आहे व यापुढेही येत राहणार आहे. सदर प्रकरणातून वारकरी संतांच्या जीवनातील अनेक तपशील वाचकांना वाचण्यासाठी मिळतात. संशोधकांना नवे आयाम या प्रकरणातून गवसतात. संतांच्या जीवन चरित्राकडे बघण्याची नवी दृष्टी सापडण्यास मदत होते. संतांच्या जीवनावरील कादंबऱ्यांची माहिती उपलब्ध होते.

'ज्ञान तेच देव' या कादंबरीचे विश्लेषण करताना लेखक लिहितात, 'विठ्ठलपंत ज्ञानदेवाला ओमकार, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, पुराणग्रंथ, वैज्ञानिक गोष्टी व व्यवहार ज्ञान, स्तोत्रे, उपनिषदातील मंत्र, गीता, वनस्पती शास्त्राचे ज्ञान, महाभारत, रामायण, योग, धर्मविधी, खगोलशास्त्र

वारकरी संत चरित्रात्मक कादंबरी
राजेंद्र थोरात
संस्कृती प्रकाशन,पुणे
पृष्ठ-२०८
किंमत-२५०

इत्यादींचे ज्ञान देतात.' हा संदर्भ नव अभ्यासक-संशोधकांसाठी नाविन्यपूर्ण व उपयुक्त आहे. संत ज्ञानेश्वरांच्या व्यक्तित्वाची जडणघडण कशा प्रकारे झाली याचे तपशीलवार वर्णन कादंबरीकार रमेश बावकर यांनी स्पष्ट केले आहे. पारंपरिक तुकोबांऐवजी तुकोबांच्या जीवनातील सत्य शोधण्याचा प्रयत्न दि. बा. मोकाशी यांनी कसा केला आहे, याविषयीचे विवेचन राजेंद्र थोरात यांनी केले आहे.



'वारकरी संत दर्शन' या महत्त्वाच्या प्रकरणातून एकूण अकरा संतांचे दर्शन राजेंद्र थोरात यांनी नेमकेपणाने घडविले आहे. संत, कवी, तत्त्वज्ञ, प्रबोधनकार, संघटक, मानवतावादी संत ज्ञानेश्वरांचे दर्शन 'ताटी उघडा ज्ञानेश्वरा, इंद्रायणीकाठी, मोगरा फुलला, सोन्याचा पिंपळ या कादंबऱ्यांतून कसे घडते याचे वर्णन ओघवत्या शैलीत राजेंद्र थोरात यांनी केले आहे. भागवत धर्माची पताका पंजाबपर्यंत अभिमानाने फडकाविणाऱ्या, श्रीविठ्ठल भक्तीत रममाण असणाऱ्या, संत ज्ञानेश्वरांबरोबर तीर्थयात्रा करणाऱ्या संत नामदेवांचे दर्शन नामा भोळा भाग्यवंत, नामाचा गजर, आम्ही चिरे पायरीचे, घास घेई पांडुरंगा या कादंबऱ्यांतून घडते. शांतिब्रह्म संत एकनाथांचे व्यक्तित्व या प्रकरणातून प्रतीत होते. संतश्रेष्ठ तुकोबाचे अभंग व पारंपरिक चरित्रे आधाराला घेऊन कादंबरीकारांनी आकाशाएवढ्या तुकारामांचे चित्रण कसे केले आहे याचेही वर्णन सदर प्रकरणात आले आहे. विशेष म्हणजे संत मुक्ताई, संत जनाबाई, संत बहिणाबाई या संत कवयित्रींचे दर्शन प्रस्तुत प्रकरणातून घडते. वारकरी संतांची समाजातील प्रबोधनकारांची भूमिका किती सुस्पष्ट होती हेही चित्रित होते. तत्कालीन सामाजिक परिस्थितीमध्ये माणूस म्हणून संतांना करावा लागणारा संघर्षही येथे अधोरेखित झाला आहे. एकूणच काय, तर पारंपरिक चौकट मोडून लेखकाने मोजक्या संदर्भांसह वाचकांसमोर विश्लेषण केले आहे. नेमकेपणाने व ओघवत्या शैलीतील 'संतदर्शन' वाचनीय आहे.

'वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीतील समाज चित्रण' या प्रकरणात यवनी अत्याचारांचे वास्तव चित्रण, वारकरी संतांची नीतिमूल्यांची शिकवण, रूढी-परंपरा, धार्मिकता व वर्णव्यवस्था, दुष्काळाचे भीषण रूप, कुटुंबव्यवस्था, विवाह समारंभ, विविध खेळ इत्यादी घटकांचे सखोल विवेचन राजेंद्र थोरात यांनी केले आहे. संत साहित्याचा अभ्यास करण्यासाठी आपला दृष्टिकोन अधिक व्यापक होण्याच्या शक्यता या प्रकरणातून निर्माण झाल्या आहेत.

'वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीची ऐतिहासिकता या प्रकरणात लेखकाने आपली भूमिका अतिशय ठामपणे, वस्तुनिष्ठतेने स्पष्ट केल्यामुळे संत साहित्याचे वाचन कसे करायला हवे, दृष्टिकोन चिकित्सक कसा हवा, संत साहित्याचा अभ्यास करताना भावनिकतेपेक्षा, श्रद्धेपेक्षाही वैचारिक 'मंथन' कसे आवश्यक हे स्पष्ट होते. 'वारकरी संतविषयक कादंबरीकारांनी सांप्रदायिक चरित्रांचा आधार घेऊन कादंबरी लेखन केले आहे. पारंपरिक चरित्रांतील विविध चमत्कार कादंबरीकारांनी काव्यात्मकतेने व नाट्यात्मकतेने रेखाटून चमत्कारांतून संतांचा गौरव केला आहे. वारकरी संत चरित्रात्मक कादंबरी ऐतिहासिकतेचा वेध घेण्याच्या दृष्टीने कुचकामी ठरलेली आहे. तत्कालीन विविध संप्रदाय, गुरू-शिष्य परंपरा, श्री विठ्ठल व पंढरीची वारी इ. चित्रण कादंबऱ्यांतून येत असले तरी त्यामध्ये ऐतिहासिकदृष्ट्या चिकित्सेऐवजी भावनाशीलताच आढळते'. राजेंद्र थोरात यांच्या वरील विश्लेषणावरून लक्षात येते की, त्यांनी वस्तुनिष्ठ दृष्टिकोन समोर ठेवून वारकरी संत चरित्रात्मक कादंबरीची ऐतिहासिकता स्पष्ट केलेली आहे. मुळामध्ये महाराष्ट्रीय संस्कृतीचे वाङ्मयीन, सामाजिक पर्यावरण जर आपण पाहिले, तर ते परंपराप्रिय असलेले दिसते. ऐतिहासिकदृष्ट्या वस्तुनिष्ठ संशोधन वर्तमानात आवश्यक आहे. सध्या सांप्रदायिक, धार्मिक, सांस्कृतिक दृष्टिकोन अधिकाधिक एकांगी आणि परंपराप्रिय अशा चौकटीत बद्ध होत आहे. अशा वातावरणात संतसाहित्यविषयक लेखन करताना अधिक काळजी घ्यावी लागते. सामाजिक परिस्थिती लक्षात घेऊन लेखकाला लेखन करावे लागते. संत साहित्यविषयक आकलनाचा परिप्रेक्ष्य तयार व्हावा, वारकरी संप्रदायातील प्रबोधनात्मक लेखनाची, विचारांची ओळख व्हावी, वारकरी संप्रदायातील मूल्यात्मक विचार मंथन व्हावे, युवा वर्गाने संत साहित्याकडे वळावे या सर्व पार्श्वभूमीवर योग्य संदर्भांचा खजिना असणारा राजेंद्र थोरात यांचा 'वारकरी संत चरित्रात्मक कादंबरी' हा मौलिक ग्रंथ महत्त्वाचा आहे. सदर ग्रंथ संत साहित्यविषयक अभ्यासाचे नव-नवीन 'परिप्रेक्ष' निर्माण करणारा आहे. वारकरी संप्रदायाच्या अभ्यासकांबरोबरच सर्वच वाचक संशोधकांना हा मौलिक ग्रंथ मार्गदर्शक आहे

●

**डॉ. हरेश शेळके**
मराठी विभाग
न्यू आर्टस कॉमर्स अँन्ड सायन्स कॉलेज,पारनेर
संपर्क:९७६७१७६६५१



अनुक्रमणिका





पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ. राजाभाऊ भैलुमे

# ‘थट्टा मस्करी’तून समाजभान




डॉ. रवींद्र लक्ष्मीकांत तांबोळी यांचे ६ एप्रिल २०१९रोजी ‘थट्टा मस्करी’ हे विनोदी लेखनावरील पुस्तक पद्मगंधा प्रकाशनाने प्रकाशित केले आहे. मराठी साहित्यातील विनोदी लेखनाची परंपरा समृद्ध करणारे सदर पुस्तक असल्याने त्यावर आपण लिहावे असे मनोमन मला वाटले म्हणून हा शब्दप्रपंच. पु. ल. देशपांडे यांच्या विनोदी साहित्यावर फार कमी लिहिले गेले; परंतु हेच साहित्य जास्त वाचलेही गेले, हे वास्तव आहे. विनोदी साहित्यावर लिहिणे फार अवघड आहे, हा माझा अनुभव आहे. फक्त रंजनासाठी मराठीत शक्यतो लिहिले जात नाही. विनोदातून मानवी विकृत स्वभावावर, सामाजिक अनिष्ट रूढी परंपरेवर व वास्तवावर थेट लिहिले जाते. विनोदी शैली असल्यामुळे हा घाव फारच खोलवर, मर्मस्थानावर मारला जातो. त्यामुळे नेमकी काय समीक्षा करावी, हा प्रश्न बहुतेक त्रस्त करतो कारण काही गोष्टी समीक्षेतून स्पष्ट लिहिताही येत नाहीत. दुःख साहित्यातून फार येते. त्यावर फार लिहिलेही जाते; परंतु आनंदी, विनोदी साहित्य फार कमी लिहिले जाते व त्यावर लिखाणही कमीच होते. विनोद ऐकून, समजून घेऊन, आनंद घेऊन, हसून सोडून द्यावा हीच वृत्ती सर्वत्र दिसते. विनोद समजून घेण्यासाठी बुद्धी तेज हवी. शब्दांची, इतर संदर्भाची चांगली जाण हवी, तरच त्याचा आस्वाद घेता येतो. या आस्वादाला समीक्षेच्या रूपात मांडणे हे फारच अवघड काम आहे म्हणून विनोदी साहित्यावर जास्त समीक्षा होताना दिसत नाही. गो. मा. पवार यांनी यावर सविस्तर लिखाण केलेले आहे. अशी अपवादात्मक काही नावे सांगता येतील.

‘थट्टा मस्करी’ या पुस्तकात एकूण अठरा विनोदी किस्से रवींद्र तांबोळी यांनी आत्मकथन स्वरूपात सांगितलेले आहेत. वाङ्मय क्षेत्रातील कथा, चरित्र, आत्मवृत्त अशा कोणत्याच वाङ्मयप्रकारात सदर लेखन घालता येणार नाही. यात कुठेही एखादे कथानक, घडामोडी येत नाही. पारंपरिक वाङ्मय प्रकाराच्या चौकटीत न बसणारे; परंतु मदमस्त साहित्यास्वाद देणारं सदर लेखन आहे. इथे लेखक पात्राच्या भूमिकेत, निवेदकाच्या भूमिकेत सतत वावरताना दिसतो. या लिखाणाची बलस्थाने म्हणजे लेखकाची भाषा, भाषाशैली, कल्पना, विनोदी दृष्टी होय. यात येणारी पात्रे यातील एक दुय्यम, अपरिहार्य गोष्ट म्हणूनच येतात; परंतु यांच्यामार्फत पुढे येणारे वास्तव, विकृती, बदललेला समाज व समाजभान या गोष्टी मुख्य नायकाच्या भूमिकेत येतात. लेखक सर्वत्र जागोजागी येत असला तरी लेखकाच्या कडीने हे साहित्य फिरताना दिसत नाही. हे या लेखकाचे बलस्थान व चतुराईच आहे. लेखकाने आपल्या कल्पनेला, विनोदी बुद्धीला व यासाठी निर्माण केलेल्या नवशब्दांना, विनोदी शैलीला जास्त महत्त्व दिल्यामुळे हे शक्य झाले आहे म्हणून हे उच्चदर्जाचे विनोदी लेखन ठरले आहे. लेखक दिसतो तो विनोदी दृष्टिकोनात, विनोदी शैलीत, नवशब्दनिर्मितीत सतत मागील बाजूस. म्हणून वाचक या लिखाणाशी तादात्म्य पावतो. निखळ आनंदोत्सवात नाहतो.

लेखकाच्या प्रतिभेची ताकद त्यांनी वापरलेल्या व निर्माण केलेल्या, पर्यायी शब्द दिलेल्या शब्दांमार्फत समजते. त्यांनी खासकरून वापरलेले शब्द ‘निकोटीनधारी सारे पदार्थ’, ‘तांबूलभक्षण’, ‘टॉर्चस्वरूप पत्नी’, ‘सत्ताग्रह’, ‘सुशिक्षित निरक्षर’, ‘तीर्थप्राशनाची मात्रा’, ‘घरबसलेपणातील एकमेव गृहउद्योगामुळे’, ‘समर्थाघरचे श्वान’, ‘दोन पेग परिषद भरली’, ‘विकतच्या श्रोत्यांसमोर’, ‘पत्नीभक्तिपरायण’, ‘श्वशुरांना’, ‘समाजातला प्रतिष्ठा-निर्देशांक’, ‘ढेकूणसंहिता’, ‘रोजचाल विधेयक’ असे असंख्य शब्द वेळोवेळी वापरल्यामुळे विनोद निर्माण होण्यास मोठा हातभार लागलेला आहे. त्यांनी स्वतः काही शब्दांची निर्मिती केली आहे, तर काही शब्दजोड्याही तयार केलेल्या आहेत. उदा. ‘भोग व्यवस्थापन’, ‘भक्तिव्यवसाय’, ‘बोकडनवमी’, ‘कुक्कुटपौर्णिमा’, ‘शोषणशास्त्र’, ‘मत्समास’, ‘ब्रॅकेटमामा’, (कंस मामा), ‘डोळ्यांची मुंबई’, ‘सुरक्षित बेकार’, ‘दशमदेवता पत्नीमहोदया’, ‘जिल्हा सारस्वत’, ‘उदास कवी’, ‘भकासकवी’, ‘शिखर कवी’, ‘तळ कवी’, ‘पुरस्कार कवी’, ‘तिरस्कृत कवी’, ‘बेफाट कवी’, ‘सुसाट कवी’, ‘अनुदानित कवी’, ‘शीघ्र कवी’, ‘विनाअनुदानित कवी’,

'संथ कवी', 'शासकीय कवी', 'अशासकीय कवी', 'प्रायोजित कवी', 'अप्रायोजित कवी', 'वातापी कवी', 'मान्य कवी', 'अमान्य कवी', 'उल्लेखित कवी', 'अनुल्लेखित कवी' या अशा असंख्य नवशब्दांतून, शब्दजोडीतून विनोदाची उकळी फुटते. मनात सतत गुदगुल्या होतात. असेच असंख्य पर्यायी शब्दही चपखलपणे तांबोळी वापरतात. त्यामुळे एक प्रकारे विनोदाला फोडणीच बसते. उदा. 'गुगल ब्रह्म', 'गुगल विष्णू, 'भोगगुरू', 'चिल्ड संप्रदाय', 'भक्ती व्यवसाय', 'व्यवस्थापन श्रद्धेचे', 'www म्हणजे वाईट वळणाची वाट', 'दशमग्रह अर्थात सत्ताग्रह', 'दारू म्हणजे तीर्थ', 'अध्यापनास सज्ज असलेल्या शिक्षकरूपी खंब्याला तो घेऊन आला. सोवत शैक्षणिक साहित्यही होतेच,' 'मित्रांनी काठोकाठ ज्ञान भरून घेतले', 'पुण्यद्रवी गोवर्ग', 'एकीला खट्टे खावेसे वाटायला कारणीभूत ठरले', 'जनकल्याणाचा वसा घेऊनच नारायणरावांनी आपले तारुण्य गावासाठी झोकून दिले', 'कुग्राम', 'अर्थगंगा', 'विजयपेरणी', 'सीएसटीवर उतरल्यानंतर इकडे-तिकडे चांदणे पाहत', 'ढेकूणदंशामधून मिळणारे जीवनदान', (भ्रष्टाचार, शोषणातून) 'संतांचा रोड ट्रॅफिक सेन्स'.

मराठीत जे काही उत्तम काव्य आहे त्यातील महत्त्वाच्या काव्याचे विडंबन बेमालूमपणे रवींद्र तांबोळींनी केलेले आहे. त्यामुळे नाविन्याचा विनोदी आस्वाद अनुभवास येतो. यात प्राचीन श्लोक रचना, अभंग रचना व मराठीतील परिचित कवींच्या रचनांचा खुबीने वापर वेगळ्या अर्थनिर्मितीसाठी केलेला आहे. फक्त त्या काव्याच्या लयीचा, शब्दांचा उपयोग केलेला दिसतो. उदा.-

१ः 'गुगल ब्रह्म, गुगल विष्णू
गुगल देवो महेश्वरा
गुगल साक्षात् परब्रह्म
तस्मे श्री गुगलै नमः'

२ः 'ऐका गुरुवर्य की
मार्जारवेढ पडला तर
कुक्कटबळी द्यावा
विव्हळते श्वान ऐकून तर
बोकूडच हादडावा
पहिले घुवड दारी तर
मत्स्य तळून भक्षावा
हीच मात्रा अशुभावरती
हाच उपाय मानावा'

४. 'हे आहे जे असे ते ऐसेची राहावे'

५. 'आम्ल मनीचे वाहू दे' मॉकर म्हटल्याप्रमाणे

६. 'जे जे हरवले आजवरी..
त्याने प्रसन्न साक्षात हरी'

अशी अनेक विडंबने जागोजागी पेरल्यामुळे हश्याचे झरे सतत आतून पाझरत राहण्यास मदत होते. त्यांनी नवीन तयार केलेल्या म्हणी, वाक्प्रचार, स्लोगन्स खरोखरच सामान्य माणसाला विचार करायला लावणारे आहेत. वास्तवाची तीव्र जाणीव करून देणारे आहेत.

' दे रे हरी पलंगावरी माझा मोबाइल व्हायब्रेशनवरी'
'रिकामे जे डोके, ते झोप येण्या सोके'
'देह मोठा पुरुषार्थ छोटा'
'अंगात नाही दम, प्यायला गेले रम!'
'पुरुषार्थाची एक कहाणी, समाज गातो त्याची गाणी'
'एका नजरेचा खेळ आणि नंतर वेळच वेळ'
'हे राज्यची माझे घर'
'जोपर्यंत विकास चालू राहणार आहे' तोपर्यंत भ्रष्टाचार जिवंत राहणार आहे.'
'नियमित कर भरा, चरितार्थ होईल बरा'
'जपून टाक पाऊल जरा, पायामध्ये बूट बरा'
'जे मीठ खाता, त्यालाच जागा, रोख देऊनी क्वार्टर मागा...'
'कल कमाव और वाद में आव'

अशा असंख्य रचना जागोजागी त्यांनी पेरल्यामुळे हास्याचा सतत पुरवठा होत राहतो.

रवींद्र तांबोळी आपले हे लेखन करताना, आपण आपले स्वानुभव सांगत आहोत या भूमिकेतून लेखन करतात. स्वतःचा 'आम्ही', 'आमची' अशी आदरार्थी भावना मनात उत्पन्न तर होतेच; परंतु लेखकाचा आत्मविश्वासही डोकावतो. विनोदाला एक प्रकारची जागा यामुळे तयार होते व ही विनोदाची गाडी काही सेकंदांत पाचव्या गिअरवर जाऊन सुसाट प्रवास करते. यातील आम्हीच्या आलेल्या अनुभवांकडे पाहण्याची विनोददृष्टी उच्च, नवविनोदशैलीतून चपखलपणे मांडल्यामुळे हास्याची साखळी शेवटपर्यंत टिकून राहते. पूर्वीच्या मराठीतील विनोदी लेखकांचे साहित्य वाचले, तर एक लक्षात येते, की घटना प्रसंगातून, विसंगतीतून, विचित्र व्यक्तिचित्रणातून विनोद निर्मिती केली जाई. तो विनोद पूर्ण झाल्यावर हास्य उत्पन्न होतं. रवींद्र तांबोळी यांची लेखणी मात्र पु. ल. देशपांडे, प्र. के. अत्रे यांच्या वळणावर जाणारी किंबहुना अधिक सकस प्रवास करणारी आहे. यांची सुरुवातीपासूनच निवेदनशैली, लेखनशैली, विनोदनिर्मितीच्या रोखानेच असल्यामुळे एकदम हास्य निर्माण न होता सुरुवातीपासूनच हास्य, की जे बौद्धिक आहे. लेखनशैलीतून.

विनोदी दृष्टीतून जे निर्माण झालेले आहे, याची अनुभूती शेवटपर्यंत येत राहते. एकदम खळखळून हसवणारे सदर लेखन नाही, तर मनात सुरुवात ते वाचन पूर्ण झाले तरी एक हास्याची लहर जिवंत ठेवणारे सदर लेखन आहे.

सदर विनोदी लेखन निखळ, मर्मभेदी, प्रबोधनात्मक, सामाजिक अनिष्ट गोष्टींवर ओरखडे ओढणारे आहे. त्यामुळे कोणत्याही वाचकाचे मन दुखावणारे नाही. कुणाची बाजू घेणारे, कुणाला लक्ष्य करणारे ठरत नाही. भारतीय व्यक्ती वेगवेगळ्या भावना कुरवाळत जपणारा असतो. अशा कोणत्याही भावनांना इथे ठेच पोहचत नाही. आध्यात्मिक पौराणिक कथनाची जी एक भाषा असते, जे काही शब्द असतात, त्याच कथनाचा, शब्दांचा उपयोग मोठ्या प्रमाणात करत व समाजवास्तवावर, समाजस्वास्थ्य बिघडवणाऱ्या व्यक्तींवर हल्ला केल्यामुळे एक प्रकारची केमिस्ट्री, विरोधाभास नकळत निर्माण होतो. यावर तांबोळी पूर्णपणे ताबा ठेवत वेगाने स्वार होतात. त्यामुळे मराठीत आजपर्यंत अशी हास्यफवारणी कोणीही करू शकले नाही. ते काम तांबोळी करू शकले.

अतिशयोक्ती, शाब्दिक कोट्या, विसंगतीतून विनोद अशी पारंपरिक पायवाट रवींद्र तांबोळी अवलंबीत नाहीत, तर नवीन शब्दांची निर्मिती, बेमालूम पर्यायी शब्द, शब्दजोड्या, काव्य विडंबन, आधुनिक म्हणी, वाक्प्रचार, स्लोगन्स याचा ते वापर करतात. त्यामुळे विनोदी साहित्यात तांबोळी यांनी आधुनिकता आणली, नवप्रयोग केला असे ठामपणे म्हणता येते.

रवींद्र तांबोळींच्या विनोदी लेखनाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी निवडलेले विषय. विनोदासाठी मूर्ख पात्रे, रोमँटिक घडामोडी, समाजातील विसंगती या स्वरूपाचे विषय असत. तांबोळी यांनी मात्र 'संतांचे वाहनविचार, 'आमचाही संवाद, युवतीशी', 'महाराष्ट्राची पहिली कविगणना २०१८' असे वेगवेगळे विषय घेतलेले दिसतात. यातून शब्दांचे लावलेले अर्थ आणि आजच्या समस्यांचा त्यांच्याशी घातलेला मेळ पाहता यातील नाविन्यता लक्षात येते. कवींची केलेली गणना तर थक्क करते व हे सर्व विनोदापुरते न राहता समाजवास्तव हेच आहे, याची जाणीव होते. तांबोळी यांनी विनोदातून परमार्थ मिळवलेला आहे. कोणत्याही विषयावर विनोदात्मक शैलीने लिहिता येते हा आत्मविश्वास तांबोळी यांनी यातून दिलेला दिसतो. त्यांनी वापरलेल्या उपमा, केलेले स्पष्टीकरण, वाचताना गुदगुल्या केल्यानंतर उत्पन्न होणारे जे हास्य असते तसे हास्य निर्माण होणे, एकूणच आत्मिक, बौद्धिक आनंद देणारी भाषा वापरल्यामुळे उच्चप्रतीचा, निर्लेप आनंद कसा निर्माण करता येतो याचे उत्तम उदाहरण म्हणजे तांबोळी यांचे हे विनोदी लेखन होय; परंतु एकमात्र खरे की, वाचकाला आध्यात्मिक, पौराणिक, सामाजिक, राजकीय, शैक्षणिक, आर्थिक असे सर्व संदर्भ माहीत हवे. याचा अर्थ सामान्य वाचकाला यातील मार्मिक हास्याची रेल्वे पकडता येणार नाही.

सूचकता, मार्मिकता, साम्यता बेमालूमपणे रवींद्रजी हाताळतात. हे सर्व मिश्रण ते आपल्या विनोदीशैलीने व विनोदीदृष्टीने एकजीव करत असल्यामुळे या साहित्याची परिणामकारकता वाढलेली आहे. हे लेखन कुठेही निराश करत नाही. अगोदरच्या विनोदी लेखनाची री ओढत नाही. अंगावर आल्यासारखे लेखन वाटत नाही, तर उच्चदर्जाच्या ज्ञानामृताच्या हळूहळू उडत जाणाऱ्या रसयात्रेची अनुभूती देणारे ठरते. थोडक्यात, 'स्मितहास्यानुभवाचा निखळ विनोदी झरा' असे या लेखनासंबंधी म्हणता येते.

भारतातील मोजक्या भाषांपैकी मराठी ही अशी भाषा आहे की, ज्यातून उच्च दर्जाचा विनोद निर्माण करता येतो. विनोद निर्मिती हे कुशाग्र बुद्धीचे लक्षण आहे. असे असताना मराठी साहित्यात विनोदी साहित्याचा प्रवाह फारच क्षीण आहे. कदाचित मराठी संत साहित्य व मराठी वैचारिक साहित्य व मराठी सामाजिक साहित्यामुळे हा मराठीचा झरा झाकोळून, दबून गेलेला दिसतो. या वरील सर्व साहित्याचे गुणविशेष विनोदी साहित्यात आणता येऊ शकतात. किंबहुना जे स्पष्ट सांगता येत नाही ते विनोदीशैलीने, पर्यायी परिभाषेने उत्तमप्रकारे सांगता येते हे रवींद्र तांबोळी यांनी या लिखाणातून दाखवून दिले आहे.

विनोदी साहित्य वाचणे व लिहिणे नेहमी कमी प्रतीचे, दुय्यम मानले गेले आहे. ही गोष्ट चांगली नाही. रवींद्र तांबोळींसारखे नवनवीन प्रयोग करत, विनोदी साहित्याचा प्रवाह जर जोमाने मराठी साहित्यात निर्माण झाला, तर त्याचा साहित्य व समाज यांना मोठा फायदा होईल, असे वाटते. नाटके, चित्रपट, टी.व्ही.वरील कार्यक्रम विनोदी चालतात मग साहित्य का नको? हा प्रश्न पुढे नक्कीच विचारात घेऊन विनोदी साहित्याला मराठीत चांगले दिवस येतील असे रवींद्र तांबोळी यांचे साहित्य वाचून वाटते.

●

**प्रा. डॉ. राजाभाऊ विनायक भैसुमे**
सहयोगी प्राध्यापक,
चा. ता. बोरा महाविद्यालय, शिरूर,
चलभाष : ९८२२२१५३८८



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

अंजली कुलकर्णी

# देहमनाच्या गुंतागुंतीचा विस्तृत पट




र्तमानकाळात कादंबरी हा वाङ्मयप्रकार प्रभावाने हाताळणाऱ्या लेखिका अगदी एका हाताच्या बोटावर मोजण्याइतक्याच असतील. त्यात अंजली सोमण हे एक नाव आहे. बऱ्याच कालावधीनंतर त्यांची 'देहाचिये गुंती' ही कादंबरी वाचकांसमोर आली आहे.

खरेतर या कादंबरीत मनाचे गुंते अधिक आहेत, मात्र त्यांचा उगम देहात आहे आणि देहाचे गुंते मनाच्या आवर्तातून जन्माला येतात. देहमनाच्या गुंतागुंतीचा एक विस्तृत पट या कादंबरीत मांडलेला आहे.

१९ व्या शतकात सिग्मंड फ्रॉईडने हा देहमनाचा गुंता सिद्धांतरूपाने प्रथम मांडला होता. त्याने म्हटले होते, की मानवी वर्तन हे मनाच्या इड, इगो आणि सुपरइगो या तीन घटकांमधल्या आंतरक्रियांमधून घडते. सुपर इगो हा वयाच्या तीन ते पाच इतक्या कमी वयापासून विकसित होत असतो आणि तो व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाची नैतिक, सामाजिक दृष्टीने जडणघडण करीत असतो.

फ्रॉईडने असेही प्रतिपादन केले होते, की माणसाच्या हातून होणाऱ्या बहुतांश चांगल्या-वाईट कृतींच्या मागे लहानपणापासून त्याच्या मनात जाऊन बसलेल्या लैंगिक भावना, अनुभव असतात.

फ्रॉईडने सायकोॲनॅलिटिकल पद्धतीने माणसांच्या अबोध मनापर्यंत पोहोचून, त्यांच्या पूर्वायुष्यातील दु:खद, गंडकारक घटनांचे आकलन करून घेऊन त्यातून बाहेर पडण्याची पद्धती विकसित केली. बालपणात पाहिलेल्या, अनुभवलेल्या सेक्सविषयक घटनांनी ग्रस्त असलेल्या असंख्य व्यक्ती पुढच्या आयुष्यात त्या गंडाचे दु:खाचे ओझे वागवतच जगतात. त्यांच्या स्वत:च्या लैंगिक वर्तनावर तर त्याचा खोल परिणाम होतोच, परंतु सामाजिकदृष्ट्याही अशा व्यक्ती स्वत:ला दुर्बल, कमजोर, अपराधी समजतात. न्यूनगंड, अपराधगंडाने त्रस्त राहतात.



खरेतर, सेक्स ही जीवनातील एक सुंदर, नैसर्गिक आणि महत्त्वाची घटना असते. तिच्याकडे निकोप दृष्टीने पाहणाऱ्या स्त्रीपुरुषांचे सहजीवन आनंदाने काठोकाठ भरते; परंतु समाजातील नीतिमत्तेविषयक अनेक चुकीच्या समजुती, रुढी या सहजसुंदर घटनेवर कुरूपतेचा, विकृतीचा मळका अंगरखा चढवतात आणि व्यक्तीच्या जीवनातील सौंदर्य, आनंदाचे क्षण हरवून जातात.

'देहाचिये गुंती' या कादंबरीत अंजली सोमण यांनी अशाच ग्रस्त व्यक्तिरेखांच्या मनोगतांच्या गुंफणीतून एक मोठा गंभीर विषय मांडला आहे.

विद्या, क्रांती, योगेश आणि प्रेमा या चार व्यक्तींच्या मनांतली स्पंदने टिपत

कादंबरीतील सूत्र पुढे सरकते. या चौघांची ही मनोगते आहेत. एकप्रकारे फ्रॉईडीयन ॲनॅलिटिकल पद्धतीने ही पात्रे आपले पूर्वायुष्य वाचकांसमोर उलगडून ठेवतात. मानवी मेंदूत बसवलेला 'वटवट्या' सतत स्वत:शी बडबडत असतो. भूत, भविष्य व वर्तमान यांतून तो स्वैर संचार करीत असतो. या चौघांच्या मेंदूतील 'वटवटे' आपल्याला त्यांच्या आयुष्यातील घटनाक्रम सांगत राहतात. ह्या व्यक्ती त्यांचे पूर्वायुष्य तर सांगतातच; परंतु त्या सगळ्या एका मध्यवर्ती व्यक्तिरेखेभोवती फिरतात. ती व्यक्तिरेखा म्हणजे परम उर्फ परमानंद गुरुजी उर्फ स्वामी. विशेष म्हणजे परम वा परमानंद गुरुजी कादंबरीत स्वतः कुठेच बोलत नाही; पण इतर पात्रांच्या मनोगतांमधून ती पात्रे त्यांच्याविषयी बोलत राहतात, आणि त्यातून आपल्याला परमचा, परमानंद गुरुजी नंतर गुन्हेगार आणि शेवटी मृत्यू असा अस्वस्थ करणारा प्रवास समजंत जातो. परमचा हा प्रवास त्याच्याबरोबरच त्याच्याशी संबंधित इतर व्यक्तींनाही उद्ध्वस्त करत जातो.

हा प्रवास यांतील परमसकट पाच प्रमुख व्यक्तिरेखांच्या कामप्रेरणांचा प्रवास तर आहेच; परंतु त्या सर्वांच्या मनोगतांतून भेटणाऱ्या इतरही संबंधित अनेक व्यक्तींच्या गुंतागुंतीच्या कामजीवनाचा तो प्रवास आहे. जन्माला आल्यापासून माणसांची आयुष्यं परस्परांमधील क्रियाप्रतिक्रियांनी, त्यांना दिलेल्या सुखदु:खाच्या आशा-निराशेच्या, उपेक्षा-अवहेलनेच्या शिडकाव्यांनी, तडाख्यांनी कशी घडत-विघडत जातात याचे असंख्य मनोज्ञ दाखले यातील व्यक्तिरेखांच्या जीवनातून मिळत जातात. या कादंबरीत आपल्याला माणसांच्या मनांचे परस्परांत गुंतलेले असंख्य पीळ जाणवतात.

याशिवायही या कादंबरीचे इतर अनेक पैलू आहेत. इथे विविध ज्ञानशाखीय चर्चा व्यक्तिरेखांच्या मुखांतून घडते. त्यात मानसशास्त्रीय विश्लेषण, मानवी वर्तन, सामाजिक समस्या, घडामोडी, विविध विचारप्रवाह यांचे दर्शन घडते. त्याचबरोबर परमला परमानंद गुरुजी बनवणारी समूहाची मेंढरछाप मानसिकताही फार प्रभावीपणे जाणवते. त्याच्या मूळ समाजाला आनंदमार्ग दाखवण्याच्या सच्च्या उद्देशापासून त्याला आस्ते आस्ते दूर नेत एका अहंकारी, लोकांना उल्लू बनवणाऱ्या, बनेल, सत्ता आणि संपत्तीला लालचावलेल्या, व्यसनांच्या आहारी गेलेल्या, संपत्तीसाठी गैरमार्ग पत्करण्यास प्रवृत्त होणाऱ्या आणि वृत्तीचा समतोल ढळलेल्या परम नावाच्या व्यक्तीचा प्रवास इथे पाहायला मिळतो.

परमचे व्यक्तिमत्त्व गुंतागुंतीचे आहे. विलक्षण देखणेपण, अनेकविध ज्ञानशाखांचा सखोल अभ्यास, विविध भाषांवरील प्रभुत्व, माणसांवर/समूहावर गारुड करणारी वाणी, हृदयाला हात घालणारे संगीत-वादन कौशल्य, व्यक्तींच्या अंतरंगात शिरण्याची सहज हातोटी अशा अनेकविध गुणांनी तो युक्त आहे. त्यामुळे त्याच्याकडे माणसं ओढली जातात. समूहाला आनंदाचा मार्ग दाखवण्याच्या, त्यांना त्यांच्या समस्यांतून बाहेर काढण्याच्या त्याच्या पॅशनमुळे लोक संमोहित झाल्यासारखी त्याच्या मागे येतात. मात्र हळूहळू त्याच्यातला पॅशनेट आनंदमार्गी लोप पावत जाऊन एक विकारग्रस्त पुरुष उरतो. जे तत्त्वज्ञान, जो मार्ग तो लोकांना दाखवतो त्याच्याशी पूर्ण विसंगत असं त्याचं व्यक्तिमत्त्व घडत जातं.

मुळात परमही त्याच्या बाल / कुमार वयात त्याला भोवतीच्या जगाकडून मिळालेल्या वागणुकीतून घडला आहे. भोवतीच्या माणसांच्या आपल्याकडून असलेल्या अपेक्षा आणि आपल्या स्वत:च्या आयुष्याबद्दल असलेल्या कल्पना यांत संघर्ष झाला, की ज्या प्रकारची दुभंग व्यक्तिमत्त्वं तयार होतात तशा दुभंग व्यक्तिमत्त्वाचा तोदेखील बळी आहे. त्याच्यातील विसंगती आयुष्याच्या नंतरच्या टप्प्यांवर प्रकर्षाने दिसू लागतात.

आपल्या आयुष्यातील प्रश्न घेऊन क्रांती, योगेश, प्रेमा इ. व्यक्ती त्याच्याकडे खेचल्या जातात. जीवनातला मोठा काळ त्याच्या प्रभावात व्यतीत करतात. कालांतरानं, त्यांना परमविषयी जे जे समजत जातं त्यातून त्यांची मनं आणि आयुष्यंही उद्ध्वस्त होतात. बंध तुटल्यावरही परम त्यांच्या आयुष्यात त्रासदायक आठवणींच्या रूपात अस्तित्वात राहतोच. यांतील प्रत्येकजण आपल्या आयुष्यात सेक्सविषयक कुठल्या न कुठल्या गंडाने पछाडलेला आहे. किंबहुना हे पेच घेऊनच ते परमकडे येतात. यांपैकी विद्या अतिशय बुद्धिमान, पण रूपानं सामान्य आहे. तो तिच्या आयुष्यात एखाद्या अनपेक्षित वावटळीसारखा येतो. तिला स्वत:च्या कॉम्प्लेक्स व्यक्तित्वानं घेरून टाकतो आणि वावटळीत सापडलेल्या पाचोळ्यासारखं अचानक सोडून देऊन गायब होतो. 'परमचं मन म्हणजे ज्वालाग्राही पदार्थांनी ठासून भरलेलं कोठार आहे, आत काय काय भरून ठेवलं आहे कुणास ठाऊक?' असा प्रश्न वागवतच तिचं त्याच्याबरोबरचं जगणं ती कंठते. क्रांती ही व्यक्तिरेखा अशीच गुंतागुंतीची घडली आहे. नकळत्या वयात शरीरातली कासाविशी जागी करून त्याची कायमस्वरूपी चटक

लावणाऱ्या जवळच्या नातेवाईकामुळे ती भरकटली आहे. कलेची आवड असताना परीक्षेत मार्क मिळवण्यासाठी, डॉक्टर होण्यासाठी सक्ती करणाऱ्या, सतत टोचून बोलणाऱ्या वडिलांमुळे योगेश मुखदुर्बल होतो. त्यात वयात येण्याच्या वयात मोठ्या स्त्रीपुरुष व्यक्तींकडून विकृतपणे अनुभवाला आलेल्या लैंगिक वर्तनामुळे त्याच्या गुंत्यात भरच पडते. प्रेमाही नवरा, सासर यांच्या छळाला कंटाळलेली आहे. असे सारेच जण आपापल्या उद्ध्वस्त भावविश्वातली हताशा घेऊन जगतात. खरेतर, या साऱ्यांनाच हवे असतात फक्त चार प्रेमाचे शब्द, आपुलकीचा स्पर्श, 'तूही कुणीतरी महत्त्वाचा / महत्त्वाची आहेस' अशी जाणीव मनात फुलवण्याची गरज. आपल्याला कुणीतरी समजून घ्यावं, आपलं मनातलं ऐकावं हीच अशा व्यक्तींची किरकोळ अपेक्षा असते; परंतु जगताना माणसं याच आपुलकीच्या भावनेपासून वंचित राहतात, आणि जन्मभर प्रेमाची भुकेली राहतात.

परमला माणसांमधली हीच भूक, ही तहान बरोबर समजते. तो हुषार आहे, चाणाक्ष आहे, माणसांची मनं वाचण्याची कला त्याला अवगत आहे. या कलेच्या माध्यमातून तो माणसांना आपल्याकडे ओढून घेण्यात यशस्वी होतो. तो त्यांना आनंदाचा, शांतीचा मार्ग दाखवतो. परंतु, परम स्वत:, स्वत:तील मानसिक गुंतागुंतीचा बळी आहे. त्यात मागे येणारा समूह त्याच्याबरोबर सत्ता, संपत्तीसारखे अनेक लोभ, मोह घेऊन येतो. त्यापासून तत्त्वज्ञानी परमचीही सुटका नसतेच. या वावटळीत तो स्वत:ही भिरभिरतच जातो आणि रसातळाला पोहोचतो.

या सगळ्या व्यक्तिरेखांच्या कहाण्या शोकात्म आहेत. देहमनाच्या गुंत्यात यातला प्रत्येकजण अडकत, फसत गेला आहे. चुकीच्या लैंगिक वर्तनाच्या आगीत यातील प्रत्येक व्यक्ती होरपळून निघाली आहे, भस्मसात होऊ घातली आहे.

मात्र, ह्या व्यक्तिरेखा केवळ कल्पनेचे खेळ आहेत असे आपण म्हणू शकत नाही. या व्यक्तिरेखा आपल्याला समाजात हरघडी दिसतात. घरातल्याच काका, मामाने धाकधपटशानं केलेलं लैंगिक वर्तन हा असंख्य स्त्रियांचा बालवयातला अनुभव असेल; एवढंच नाहीतर मुलांचाही असेल. आसपास, उमलत्या शरीरातल्या संवेदनांचे काय करावे हे न समजल्याने विचित्र वर्तन करणारी कितीतरी मुले, मुली दिसतात, आणि अशा समाजातल्या समस्याग्रस्त, पीडित व्यक्तींचं शोषण करून स्वत:चे आश्रम थाटणारे, ऐषोआरामी बाबा, महाराजही पावलोपावली भेटतात. म्हणूनच ही कादंबरी म्हणजे समाजाचा आरसा आहे, असे म्हणता येते. समाजाच्या बिघडलेल्या लैंगिक आरोग्याचं प्रतिबिंबच या आरशात दिसतं. वास्तवाच्या भरभक्कम बैठकीवर हा सारा पट उभारला गेला आहे. समाजातल्या एका गंभीर समस्येला हात घालण्याचं कामच डॉ. सोमण यांनी या कादंबरीद्वारे केलं आहे.

अंजली सोमण यांनी फार धाडसाने आणि जबाबदारीने हा विषय हाताळलेला आहे. कादंबरीत काही बोल्ड वाटू शकतील अशी वर्णने आहेत; परंतु ती अनावश्यक किंवा भावना उद्दिपीत करण्यासाठी आलेली नाहीत. खरेतर, ही एक मोठीच तारेवरची कसरत त्यांनी सांभाळली/निभावली आहे. कादंबरी कुठेही सवंगतेकडे झुकणार नाही, याची काळजी त्यांनी कसोशीने घेतली आहे.

डॉ. सोमण यांच्या भाषेत विलक्षण ओघ आणि सहजता आहे. प्रत्येक व्यक्तिरेखा आपलं स्वगत इथे मांडले आहे. खरेतर प्रत्येक व्यक्तिरेखेचा स्वत:च्या मनाशी सुरू असलेला संवादच इथे प्रकट होतो. त्या प्रत्येकाच्या मनोगतात आपण गुंतत जातो, इतके प्रवाहीपण त्यांत आहे.

ही कादंबरी लैंगिक शिक्षणाची निकड अधोरेखित करते. खरेतर, या विषयावर समाजात मनोकायिक अंगाने खुलेपणाने चर्चा व्हायला हवी. वेळेवर योग्य ते शिक्षण न मिळाल्याने, घरात, बाहेर कुणाशी बोलण्याची रीत नसल्याने कुमारवयात मुले आपल्या मनातील नैसर्गिक कुतूहल, भावना चुकीच्या पद्धतीने शमवण्याचा प्रयत्न करतात अन् त्यातून सारे आयुष्य भरकटत जाते. समाजातील हे वास्तवचित्र अंजली सोमण यांनी कादंबरीरूपाने प्रत्ययकारी पद्धतीने मांडले आहे. पात्रांच्या मनोगतांची गुंफण ज्या विशिष्ट पद्धतीने केली आहे. त्यातून क्रमाक्रमाने परमचे बदलते रूप समोर येत राहते. तसेच कादंबरीचे सूत्रही पुढे सरकते. सोमण यांच्यातील आंतरज्ञानशाखीय अभ्यासक आणि कलात्मक लेखक यांच्यातील प्रभावी संगमामुळे ही कादंबरी वेधक झाली आहे, हे निश्चित.

●

**अंजली कुलकर्णी**
३ विघ्नहर, जयवर्धमान सोसायटी,
बिबवेवाडी, पुणे ४११ ०३७
भ्रमणध्वनी : ९९२२०७२१५८



कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# कार्यवृत्त नोंद

**१. दि. ८ मार्च २०१९ : जागतिक महिला दिन :**

'स्त्री एक अक्षरओळख' हा कार्यक्रम राधिका जाधव, मृणाल घोंगडे, मंजुषा उकिडवे यांनी सादर केला. आरती प्रभू, अश्विनी घोंगडे, इंदिरा संत, विंदा करंदीकर, सुरेश भट, स्पृहा जोशी या मराठी कवींसह काही इंग्रजी, हिंदी व उर्दू कवींच्या स्त्रीविषयक कविता सादर झाल्या. डॉ. अश्विनी घोंगडे अध्यक्षस्थानी होत्या.

**२. दि. १८ मार्च २०१९ : मसाप गप्पा :**

या उपक्रमांतर्गत ज्येष्ठ नाट्यअभिनेत्री व गायिका निर्मला गोगटे यांची मुलाखत शैला मुकुंद यांनी घेतली. प्रारंभी गोगटे व त्यांच्या सहकाऱ्यांनी 'नमन नटवरा विस्मयकारा' ही नांदी सादर केली. या कार्यक्रमाला संगीत रंगभूमीशी संबंधित अनेक मान्यवर, रसिक श्रोते म्हणून उपस्थित होते.

**३. दि. २८ मार्च २०१९ : कथासुगंध :**

ग्रामीण कथालेखक बबन पोतदार यांच्या पकूमावशी व वायजाक्का या दोन कथांचे अभिवाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरचे रमा नाडगौडा व नरेश गुंड यांनी सादर केले. बबन पोतदार यांनी कथांमागच्या कथा उलगडून सांगितल्या.

**४. दि. १० एप्रिल २०१९ : ज्ञानकोशकार श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन :**

पुण्यातील कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या समाधीला अनुवादक मैत्रेयी जोशी यांच्या हस्ते पुष्पहार अर्पण करण्यात आला. या वेळी मैत्रेयी जोशी व कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी विचार मांडले. कार्यवाह दीपक करंदीकर, नगरसेविका माधुरी सहस्रबुद्धे, श्याम भुर्के व केतकर कुल बंधुभगिनी उपस्थित होते.

**५. दि. १४ एप्रिल २०१९ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती व्याख्यान :**

'आधुनिक भारतातील द्रष्टे समाज पुरुष : डॉ. बाबासाहेब आंबेडकर' या विषयावर डॉ. श्यामा घोणसे यांचे अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. या वेळी परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर व वंदा जोशी उपस्थित होते.

**६. दि. १६ एप्रिल २०१९ : पुष्पा पुसाळकर पुरस्कार प्रदान समारंभ :**

'ऐवजी' या ग्रंथासाठी मनोविकास प्रकाशनाला उत्कृष्ट ग्रंथ व निर्मिती मूल्यांसाठीचा पुरस्कार मा. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते श्री. लाटकर यांना प्रदान करण्यात आला. योगेश नांदूरकर व सुरेश नावडकर हे निवड समिती सदस्य होते. योगेश नांदूरकर, श्री. लाटकर, सौ. बनहट्टी, प्रा. मिलिंद जोशी आणि मा. राजेंद्र बनहट्टी यांची यथोचित भाषणे झाली.

**७. दि. १६ एप्रिल २०१९ : यू-ट्यूब कार्यशाळा :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे 'यू-ट्यूब निर्मिती व त्याचा वापर' या विषयावर प्रा. क्षितीज पाटुकले यांचे व्याख्यान झाले.

**८. दि. २० एप्रिल २०१९ : कै. कृष्णमुकुंद उजळंबकर पुरस्कार प्रदान समारंभ :**

डॉ. गीतांजली घाटे यांना 'आक्षिप्त मराठी साहित्य' या ग्रंथासाठी हा पुरस्कार डॉ. मनोहर जाधव यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. ऊजळंबकर यांच्या प्रतिमेला पुष्पांजली अर्पण झाल्यानंतर त्यांच्याविषयी डॉ. नलिनी गुजराथी यांनी मनोगत व्यक्त केले.

**९. दि. २१ एप्रिल २०१९ : कै. रेखा ढोले स्मृती पुरस्कार समारंभ :**

म.सा. प. व राजहंस प्रकाशन यांच्या विद्यमाने दिले जाणारे पुरस्कार यंदा करुणा गोखले व मिलिंद परांजपे यांना डॉ. अरुणा ढेरे यांच्या हस्ते वितरण करण्यात आले. प्रवीण ढोले व सुषमा निसळ यांनी भावना व्यक्त केल्या. डॉ. सदानंद बोरसे यांनी 'भगतसिंगचा खटला न्यायाच्या हत्येचे कारस्थान' याविषयी मनोगत व्यक्त केले. डॉ. अरुणा ढेरे यांच्या हस्ते या पुस्तकाचे प्रकाशन झाले. गोखले, परांजपे, प्रा. मिलिंद जोशी, डॉ. अरुणा ढेरे यांची यथोचित भाषणे झाली. डॉ. श्रीराम गीत यांनी आभार मानले. प्रास्ताविक व स्वागत उद्धव कानडे यांनी केले.

**१०. दि. २१ एप्रिल २०१९ : श्रद्धांजली सभा :**

डॉ. प्रा. विजय देव यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी श्रद्धांजली सभा झाली. या वेळी उद्योजक अरुण फिरोदिया, शि. प्र. मंडळाचे अध्यक्ष अ‍ॅड. एस. के. जैन, डॉ. अरुणा ढेरे, परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, स. प. महाविद्यालयाचे प्रा. डॉ. दिलीप शेठ, मृणाल देव कुलकर्णी व वीणा देव यांनी श्रद्धांजलीपर आपले विचार व्यक्त केले. शिक्षण प्रसारक मंडळी, महाराष्ट्र साहित्य परिषद, गोनीदा दुर्गप्रेमी मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने ही सभा आयोजिली होती.

**११. दि. २५ एप्रिल २०१९ : एक कवी, एक कवयित्री :**

या उपक्रमात कल्पना दुधाळ व वीरा राठोड यांच्याशी उद्धव कानडे व अ‍ॅड. प्रमोद आडकर यांनी संवाद साधला. दोन्ही कवींनी आपल्या निवडक कविता सादर केल्या.

अनुक्रमणिका

**१२. दि. २ मे २०१९ : मसाप गप्पा :**

अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष मा. श्री. कौतिकराव ठाले पाटील यांची मुलाखत मा. श्री. नागनाथ कोत्तापल्ले यांनी घेतली.

**१३. दि. १४ मे २०१९ : कथासुगंध :**

या उपक्रमात डॉ. अरविंद संगमनेरकर यांच्या दोन कथांचे अभिवाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या अपूर्व साठे व सचिन जोशी यांनी केले. डॉ. संगमनेरकरांनी कथांमागच्या कथा उलगडून सांगितल्या. या कार्यक्रमास डॉ. संचेती श्रोते म्हणून उपस्थित होते. 'नरकात गेलेला गायनॅकॉलॉजिस्ट' व 'ह्या हातात वाळ खेळणार' या कथांचे वाचन झाले.

**१४. दि. २६ व २७ मे २०१९ : म.सा.प.चा ११३ वा वर्धापनदिन समारंभ :**

यावर्षी दोन्ही दिवसांच्या कार्यक्रमांना साहित्यप्रेमी रसिकांचा उदंड प्रतिसाद लाभला. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे व कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांचे नेटके नियोजन, व्यासपीठाची अत्यंत आकर्षक सजावट, उपस्थितांना अल्पोपहार व चहाचा कार्यकारिणी सदस्य व पदाधिकारी यांच्याकडून खास आग्रह, अध्यक्ष, मान्यवरांची दर्जेदार भाषणे यामुळे रसिकांना दोन दिवस साहित्यिक मेजवानी मिळाली.

**१५. दि. २६ मे २०१९ : वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कार प्रदान सोहळा :**

मुखपृष्ठाविषयी : 'मसाप जीवन गौरव पुरस्कार' दिलीप माजगावकर यांना प्रदान करताना डॉ. सुधीर रसाळ, डॉ. रावसाहेब कसबे, नोहा मस्सील (इस्रायल), प्रा. मिलिंद जोशी, प्रकाश पायगुडे आणि सुनीताराजे पवार.

या सोहळ्याचे प्रमुख पाहुणे मा. श्री. सितांशु यशश्चंद्र, (गुजराथ) (सरस्वती सन्मानप्राप्त साहित्यिक) यांच्या हस्ते हे पुरस्कार दिले गेले. अध्यक्षस्थानी डॉ. रावसाहेब कसबे होते. (पारितोषिक प्राप्त ग्रंथाची शीर्षके व ग्रंथकारांची नावांची यादी खाली दिली आहे.)

**१६. दि. २७ मे २०१९ : ११३ वा वर्धापनदिन समारंभ :**

ज्येष्ठ समीक्षक डॉ. सुधीर रसाळ हे मुख्य अतिथी होते. अध्यक्षस्थानी डॉ. रावसाहेब कसबे होते. या वेळी महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'जीवन गौरव' पुरस्कार, ज्येष्ठ लेखक, संपादक, प्रकाशक श्री. दिलीप माजगावकर यांना प्रदान करण्यात आला. 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' इस्राईल देशाचे रहिवासी असलेल्या नोहा मस्सील यांना देण्यात आला. तसेच 'राजा फडणीस पुरस्कार उत्कृष्ट मसाप शाखा पुरस्कार' मसाप शाखा माळ (फिरता करंडक) यांना व 'बाबूराव लाखे स्मृतिप्रीत्यर्थ राजन लाखे पुरस्कार वैशिष्ट्यपूर्ण शाखा पुरस्कार मसापच्या नाशिक रोड शाखेला देण्यात आला. ही शाखा महिलांकडून चालविली जाते. 'रत्नाकर कुलकर्णी पुरस्कार' मसापच्या सासवड शाखेचे रावसाहेब पवार यांना आणि सावेडी उपनगर शाखा, अहमदनगरचे नरेंद्र फिरोदिया यांना देण्यात आला. सर्व पुरस्कार विजेत्यांची भाषणे डॉ. रसाळ, डॉ. कसबे यांची यथोचित भाषणे झाली. तसेच मसापच्या सर्व कर्मचाऱ्यांचा स्मृतिचिन्ह देऊन गौरव करण्यात आला. ●

**प्रकाश पायगुडे,**
प्रमुख कार्यवाह, मसाप पुणे

कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर**, कार्यवाह, मसाप पुणे

**विशेष ग्रंथकार पुरस्कार [illegible]**

| पुरस्काराचे नाव | पुरस्कार विजेते |
|---|---|
| कमलताई विचारे पुरस्कृत सत्यशोधक केशवराव विचारे स्मृतिपुरस्कार (वैचारिक वाङ्मय, दलित चळवळ, सत्यशोधक, फुले आंबेडकर चळवळ) | **डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर** |
| ज्येष्ठ संपादक / लेखक रा. अ. कुंभोजकर स्मृतिपुरस्कार (सृजनशील लेखन करणाऱ्या पत्रकार/ संपादकास) | **आरती कदम** |
| कै. ग. ह. पाटील पुरस्कार (बालसाहित्यकार/ शिक्षणविषयक) | **डॉ. विजया वाड** |
| डॉ. शं. दा. पेंडसे स्मृतिपुरस्कार (संतसाहित्यविषयक ) | **किसन महाराज साखरे** |
| कृष्णराव फुलंब्रीकर स्मृतिपुरस्कार (संगीतविषयक /समीक्षकास) | **दीपा भंडारे** |
| कविवर्य भा. रा. तांबे पुरस्कार (ज्येष्ठ कवी-कवयित्रीस) | **मुकुंदराज कुलकर्णी** |
| कविवर्य ना. घ. देशपांडे पुरस्कार (गेय कविता लिहिणाऱ्या कवीस) | **जितेंद्र जोशी** |
| प्रा. गो. रा. परांजपे पुरस्कार (विज्ञानविषयक लेखन करणाऱ्या ज्येष्ठ लेखकास) | **मनीषा मंगल उज्जैनकर** |
| श्रीपाद जोशी पुरस्कार (संदर्भ ग्रंथ, अनुवाद-आंतरभारती कार्य) | **प्रा. डॉ. राजा दीक्षित** |
| कमलाकर सारंग पुरस्कार (नाट्यसंहिता / नाटककार) | **यतिन माझिरे** |
| ज्येष्ठ लेखिका कै. ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत लेखिका पुरस्कार | **डॉ. छाया महाजन** |
| प्रभाकर संत पुरस्कृत कै. आशा प्र. संत पुरस्कार ([illegible]) | **सदा डुंबरे** |
| कै. शांतादेवी आणि बाबूराव शिरोळे पुरस्कार (बालविभागाचे लेखन करणाऱ्या लेखक / लेखिकेस) | **राजीव तांबे**<br>**कविता मेहेंदळे** |
| [illegible] पुरस्कार ([illegible]) | **डॉ. विद्या सर्वे-बोरसे** |

अनुक्रमणिका



## विशेष वार्षिक ग्रंथ पारितोषिके (२६ मे २०१२)

| पारितोषिकाचे नाव | ग्रंथाचे नाव | पारितोपिक विजेते |
|---|---|---|
| सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत ॲड. त्रिंबकराव शिरोळे पारितोषिक (ललितगद्य) | त्रिज्या | डॉ. गणेश देवी |
| लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | त्यांना समजून घेताना | न्या. नरेंद्र चपळगावकर |
| सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत मालिनी शिरोळे पारितोषिक (स्तंभलेखन, ग्रंथास) | जगाच्या अंगणात (वेध आंतरराष्ट्रीय घडामोडींचा) | श्रीराम पवार |
| कमल भागवत व के. पी. भागवत पुरस्कार (मानसशास्त्र, समाजशास्त्र, स्त्रीजीवनविषयक प्रश्न) | लोकसंस्कृती दर्शन आणि चिंतन | डॉ. द. ता. भोसले |
| प्रा. उमाकांत कीर पुरस्कृत कृष्णाजी कीर पुरस्कार (ललित लेख/ ललित निबंध) | अर्धे आकाश | डॉ. अश्विनी धोंगडे |
| अंबादास माडगूळकर स्मृतिपारितोषिक (सामाजिक आशयाच्या ग्रंथास) | उजेड आणि सावल्या | वर्षा गजेंद्रगडकर |
| माधव मदाने पुरस्कृत शरच्चंद्र चिरमुले पुरस्कार (कथासंग्रहास) | ज्ञातापलीकडले | रेखा बैजल |
| ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा) | स्त्रीसंवेद्य स्त्रीच्या भावविश्वाचा शोध | डॉ. नीलिमा गुंडी |
| गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक (वैचारिक/ललितेतर/संकीर्ण) | माध्यमरंग | रविराज गंधे |
| बँक ऑफ महाराष्ट्र लोकमंगल पुरस्कृत बँकिंग क्षेत्रातील पुस्तकासाठी पुरस्कार | बँक व्यवस्थापन | डॉ. तानाजीराव चोरगे |
| माधुरी वैद्य पुरस्कृत श्रीवत्स प्रकाशनतर्फे विपुलश्री पुरस्कार (संपादित ग्रंथास) | फर्मान आणि इतर कविता : आशय आणि आस्वाद | डॉ. तुषार चांदवडकर |
| वासुदेव धोंडो आणि भागिरथीबाई दीक्षित पारितोषिक (संत /धार्मिक) | तुका झाला पांडुरंग | प्रा. दीपक बिचे |
| ग. ल. ठोकळ पारितोषिक (ग्रामीण साहित्य) | झुंड (कादंबरी) | संजय कळमकर |
| शरदचंद्र मनोहर मालेराव स्मृतिपुरस्कार (लक्षवेधी साहित्य ग्रंथ) (विभागून) | मराठीतील चरित्रात्मक कादंबरी<br>वामन निंबाळकरांची कविता : स्वरूप आणि आकलन | डॉ. शिरीष लांडगे<br>प्रा. रुपाली अवचरे |
| नी. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) | तू सुखकर्ता | बबनराव पाटील |
| कीर्तन संजीवनी पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पुरस्कार (आत्मचरित्र) | मनी'मानसी' | ऊर्मिला राजेंद्र आगरकर |
| राधाबाई सावंत आणि शिवाजी सावंत पुरस्कृत मृत्युंजय पारितोषिक (पौराणिक, वेदपुराण, रामायण, महाभारत) | हिडिंबापुत्र परमवीर घटोत्कच | डॉ. चंद्रशेखर चिंगरे |
| स रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ स्मृतिपुरस्कार (उत्कृष्ट वाङ्मयमूल्य असलेल्या ग्रंथास) | मराठी कादंबरी: आशय आणि आविष्कार | प्रा. दत्ता घोलप |
| अरविंद वामन कुलकर्णी स्मृतिपुरस्कार (कविता / सामाजिक / आशय) | प्रलयानंतरची तळटीप (काव्य) | सुचिता खल्लाळ |
| वि. वि. बोकील स्मृतिपुरस्कार (उत्कृष्ट बालवाङ्मय) (विभागून) | जॉयस्टिक (गद्य)<br>सुंदर माझी शाळा (पद्य) | सोनाली नवांगुळ<br>गणेश घुले |
| शरदचंद्र मनोहर भालेराव स्मृतिपुरस्कार (सामाजिक आशय, समाजहित प्रबंधलेखनासाठी पुरस्कार) | साठोत्तरी मराठी नाटकातील प्रायोगिकता : स्वरूप आणि चिकित्सा | डॉ. नागनाथ बळते |
| सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत डॉ. पुष्पा शिरोळे पारितोषिक (आहार/ आरोग्य / अध्यात्म) | ओबेसिटी मंत्रा<br>लठ्ठपणाः आजार व उपचार | डॉ. जयश्री तोडकर व संतोष शेणई |
| डॉ. उज्ज्वला गोखले पुरस्कृत सुभाष हरि गोखले पारितोषिक (बँकिंग, व्यवस्थापन, अर्थशास्त्र) | अर्थभानः बँकिंग आणि विमा | विनायक कुलकर्णी |
| वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) | आटपाट देशातल्या गोष्टी | संग्राम गायकवाड |



अनुक्रमणिका





| | | |
|---|---|---|
| ज. रा. कदम पारितोषिक (कृषीविषयक) | कापूस सरकीपासून सुतापर्यंत | राजीव जोशी |
| स. ह. मोडक पारितोषिक (अनुवादित ग्रंथ/अनुवादक) | आदिवासी बोधकथा-एक पुनर्कथन | सुहास परांजपे<br>स्वातीजा मनोरमा |
| प्राचार्य डॉ. शिवाजीराव मोहिते पुरस्कृत कै. डॉ. वि. ब. वनारसे नाट्य वाङ्मय पुरस्कार | ग्लोबल आडगाव व इतर एकांकिका | अनिलकुमार साळवे |
| कै. सावित्री परांजपे व कै. वासुदेव विठ्ठल पराजपे स्मृतिपारितोषिक | (सावित्रीबाई फुले विद्यापीठातून मराठी विषय घेऊन एम. ए. परीक्षेत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यांस पारितोषिक) | तृप्ती उदय फळदेसाई |
| के आर.महाडीक पुरस्कृत गीताबाई रामचंद्र महाडीक पारितोषिक (वैद्यक, पेटंट विषयक ग्रंथ) | सर्वांसाठी आरोग्य? होय, शक्य आहे! | डॉ. अनंत फडके |
| डॉ. शकुंतला क्षीरसागर पुरस्कृत विलास शंकर रानडे पुरस्कार (ग्रंथ/आरोग्यविषयक प्रकार) | पाळी मिळी गुपचिळी स्त्री आरोग्याचा शोध आणि बोध | डॉ. शंतनू अभ्यंकर |

# कार्यवाहीचा अहवाल

**महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने तिसऱ्या वर्षातही मसापला प्रगतिपथावर नेण्यासाठी दमदार पावले टाकली, त्याचा हा कार्यअहवाल**

**१ एप्रिल २०१८ ते ३१ मार्च २०१९ या कालावधीतील विशेष उपक्रम**

१. अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद साहित्यिकांना सन्मानाने दिले जावे यासाठी कार्यकारी मंडळात ठराव आणि अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळात ठाम भूमिका. घटनाबदलात मसापची महत्त्वपूर्ण भूमिका.

२. पु. ल. आणि गदिमा यांच्या जन्मशताब्दीनिमित्त शाखांच्या माध्यमातून महाराष्ट्रभर साहित्य जागर

३. कादंबरीकार ह. ना. आपटे आणि राम गणेश गडकरी यांच्या स्मृतिशताब्दीनिमित्त आणि ना. सी. फडके आणि कवी गिरीश यांच्या १२५ व्या जयंतीवर्षानिमित विशेष कार्यक्रम.

४. मसापच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयातील दुर्मिळ ग्रंथांचे डिजिटायझेशन, पहिला टप्पा पूर्ण. डिजिटायझेशनसाठी ग्रंथदत्तक योजना प्रभावीपणे राबवली. कार्यकारी मंडळाच्या सदस्यांचा ग्रंथदत्तक योजनेत महत्त्वपूर्ण सहभाग. दुर्मिळ ग्रंथ संकेतस्थळावर आणि साहित्यरसिकांना मोफत डाउनलोड करण्यासाठी सुविधा.

५. साहित्य चळवळ ग्रामीण भागात पोचविण्यासाठी शिवार साहित्य संमेलनाचे आयोजन.

६. बालकुमारांमध्ये साहित्याची आवड निर्माण करण्यासाठी शाखेमार्फत बालकुमार साहित्य संमेलनाचे आयोजन.

७. मसाप आणि साहित्यसेतू यांच्या सहकार्याने कथा, कविता, कादंबरी, ब्लॉगलेखन, कॉपीराईट आणि लेखक, सोशल मीडिया अशा विविध कार्यशाळांचे यावर्षी आयोजन.

८. मसाप, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ आणि अखिल भारतीय मराठी प्रकाशक संघ यांच्या संयुक्त विद्यमाने भिलार (महाबळेश्वर) येथे पहिल्या लेखक, प्रकाशक संमेलनाचे यशस्वी आयोजन.

९. मसापच्या वर्धापनदिन समारंभासाठी अन्य भाषांतील साहित्यिकांना निमंत्रित करण्याची प्रथा पुढे चालू ठेवली.

१०. पुणे बुक फेअरमध्ये सहभाग आणि नवोदितांच्या वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रमाचे आयोजन.

११. जेथे शाखा तेथे बैठक या निर्णयानुसार महाबळेश्वर, ठाणे, फलटण येथे बैठक.

१२. पुस्तकदिनाच्या निमित्ताने १५ मुद्रित शोधकांचा डॉ. सरोजा भाटे यांच्या हस्ते सन्मान.

१३. मसापचे विभागीय साहित्य संमेलन डॉ. अभिराम भडकमकर यांच्या अध्यक्षतेखाली गुहागरला, समीक्षा संमेलन डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या अध्यक्षतेखाली पंढरपूरला, शाखा मेळावा मंगळवेढ्याला, युवा साहित्य-नाट्य संमेलन हर्षल पाटील यांच्या अध्यक्षतेखाली अंमळनेरला संपन्न. ग्रामीण भागात साहित्य चळवळ पोचविण्यासाठी 'मसाप'चे वाङ्मयीन उपक्रम ग्रामीण भागात घेण्यास प्रोत्साहन.

१४. नेहमीच्या जयंती, स्मृतिदिन, व्याख्याने आणि पुरस्कार या कार्यक्रमांखेरीज मसाप गप्पा, कथामुगंध, एक कवी एक कवयित्री यांसह अनेक वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रमांचे सातत्याने आयोजन. त्यातून ४५ नवे कार्यक्रम सादर झाले. साहित्यविषयक काम करणाऱ्या अनेक संस्थांच्या सहकार्याने विविध साहित्यिक कार्यक्रमांचे आयोजन. शाळांत लेखक तुमच्या भेटीला हा उपक्रम सातत्याने सुरू.

१५. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात ८०% नव्या लेखक कवींना स्थान, ग्रामीण भागाला प्राधान्य.

१६. वर्षभरात ३२ शाखांना भेटी.

१७. जिल्हा प्रतिनिधींची अधिकारकक्षा वाढविली. त्यांची संमती जिल्ह्यातील नवीन शाखेच्या मंजुरीसाठी अनिवार्य केली.

१८. जिल्हा प्रतिनिधींना शाखांचे पालकत्व दिले. त्यातून शाखा सुधार, आर्थिक सबलीकरण कार्यक्रम, प्रायोजकत्व मिळवणे, वाद मिटविणे यांना गती देण्याचा प्रयत्न.

१९. शाखा सतत उपक्रमशील राहाव्यात यासाठी मसाप शाखा आणि तेथील शिक्षणसंस्थांमध्ये साहित्य-सहयोग करार घडवून आणले. त्यातून शाखा गतिमान.

२०. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात लेखक, कवींच्या सहभागासाठी जिल्ह्यांना योग्य प्रतिनिधित्व मिळावे म्हणून जिल्हा प्रतिनिधींकडून नावे मागवून समावेश.





अनुक्रमणिका

२१. 'पुण्याबाहेरील कार्यवाह' असा शब्दप्रयोग टाळून 'विभागीय कार्यवाह' हा शब्द रूढ केला.

**या वर्षातील आजीव सभासद :** ५८२

**एकूण देणगी :** ३, ४५,७३३/-

**नव्या शाखा :** १० शाखा (१. सिन्नर, २. चोपडा, ३. मंगळवेढा, ४. पारनेर, ५. भडगाव, ६.चाकण, ७. पुसेगाव, ८. चाफळ, ९. नाशिक (सिडको), १०. कर्जत (अहमदनगर).

●

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा कल्याण

**१५ ऑक्टोबर २०१८ :** महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कल्याण शाखेतर्फे १५ ऑक्टोबर २०१८ रोजी भारताचे माजी राष्ट्रपती डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांचे जन्मदिनानिमित्त 'वाचन प्रेरणा दिन' जिल्हा परिषद, शाखा पिसवली यांचे सहकार्याने आयोजित करण्यात आला होता. सदरचा कार्यक्रम जिल्हा परिषद शाळेच्या पिसवली शाखेत संपन्न झाला. त्यावेळी म.सा.प.चे ठाणे जिल्हा प्रतिनिधी माजी आमदार श्री. प्रभाकर संत, ज्येष्ठ साहित्यिक तथा म.सा.प. कल्याण शाखा अध्यक्ष जनार्दन ओक, व्यासपीठावर उपस्थित होते. प्रसंगी शालेय विद्यार्थ्यांनी म.सा.प.चे कार्याध्यक्ष श्री. भिकू वारस्कर यांची मुलाखत घेतली. तर ज्येष्ठ कवी तथा म.सा.प. उपाध्यक्ष श्री. किरण जोगळेकर, बाल कवयित्री सुरेखा गावंडे, म.सा.प. चिटणीस सौ. आशा दिलीप जोशी, सौ. रश्मी दिघे यांनी कविता व माहितीद्वारे मुलांना शिकवण दिली. जिल्हा परिषद शाळेतील मुलांनी पुस्तक प्रदर्शन आयोजित केले होते. या कार्यक्रमासाठी मुख्याध्यापक श्री. अजय पाटील व सर्व शिक्षक वर्गाने मोलाचे सहकार्य केले. या कार्यक्रमाच्या सजावटीसाठी शिक्षक व विद्यार्थ्यांनी उभारलेले पुस्तकाचे झाड सर्वांचे लक्ष आकर्षित करून घेत होते. कार्यक्रमासाठी म.सा.प. उपाध्यक्ष श्री. प्रशांत मुल्हेरकर, श्री. अरविंद शिंपी, श्री. अक्षय सुरते व पालक वर्ग मोठ्या संख्येने उपस्थित होता.

**रविवार : दि. ७ ऑक्टोबर २०१८ :** रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखा आयोजित कथालेखन कार्यशाळा हा कार्यक्रम संपन्न झाला. कार्यक्रमात एकूण १५ जणांनी सहभाग घेतला होता. कथालेखन कार्यशाळेचे मार्गदर्शन श्री. संजय भास्कर जोशी यांनी केले. कथालेखन कार्यशाळा दोन सत्रांत घेतली. कथा लिहिताना कोणकोणती अवधाने पाळावीत, ह्याची दहा सूत्रे सांगितली. त्याचप्रमाणे कथा वाचावी कशी ह्याचे प्रात्यक्षिकही दाखवले. दुसऱ्या सत्रात त्यांनी नवीन लेखकांना येणाऱ्या समस्येवर चर्चा केली.

**३. कथाकथन स्पर्धेचा निकाल जाहीर :** कथाकथन करताना कथाकाराने कथेसोबत वाहत न जाता कथा आत्मसात करून कथन करताना भावनाविवश होऊ नये, असे मत महाराष्ट्र साहित्य परिषदेचे ठाणे जिल्हा प्रतिनिधी सुरेश देशपांडे यांनी व्यक्त केले. महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेने चोवीस नोव्हेंबर २०१८ रोजी आयोजित केलेल्या कथाकथन स्पर्धेप्रसंगी ते बोलत होते. महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेने यावर्षी कथालेखन, कथा कार्यशाळा असे अनेक कार्यक्रम राबविले. या कथाकथन स्पर्धेला ठाणे जिल्ह्यातील विविध भागातून नवकथाकारांनी आपली उपस्थिती लावली. या प्रसंगी ज्येष्ठ साहित्यिक जनार्दन ओक, कवी किरण जोगळेकर, सौ. आशा जोशी तसेच मान्यवर मंडळी उपस्थित होती. स्पर्धेचे परीक्षण श्री. चांगदेव काळे, सुरेश देशपांडे यांनी केले. सौ. श्रद्धा वझे प्रथम क्रमांक, सौ. सीमा जोशी द्वितीय क्रमांक व कु. मानसी अधिकारी तृतीय क्रमांक.

**४. भिकू बारस्कर यांनी संपादन केलेल्या 'शब्द फुलोरा' या कथासंग्रहाचे प्रकाशन संपन्न :** महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेतर्फे 'शब्द फुलोरा' या नवकथालेखकांच्या कथांचा कथासंग्रह नुकताच सार्वजनिक वाचनालयाचे सभागृहात साहित्यिक सौ. ज्योती कपिले व अंबरनाथचे माजी नगराध्यक्ष श्री. सुनील चौधरी यांचे हस्ते प्रकाशित झाला. त्याप्रसंगी ज्योती कपिले म्हणाल्या, की ''नवलेखकांनी सातत्याने वाचन केले पाहिजे. वाचनाने आपली आकलन शक्ती वाढते. समाजाचा अभ्यास होतो व माणूस वाचला जातो. माणूस वाचला जाणे महत्त्वाचे आहे. वाचनामुळेच लेखन स्फूर्ती मिळते. म्हणून भरपूर वाचन करा.'' महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेचे कार्याध्यक्ष भिकू बारस्कर यांनी संपादन केलेला हा कथासंग्रह मसापच्या इतिहासातील पहिलाच कथासंग्रह आहे. या पुस्तकामध्ये एकूण अठरा कथाकारांच्या कथा आहेत. दिल्ली, चंद्रपूर, पुणे, मुंबई, बुलढाणा येथील लेखकांचा यामध्ये समावेश आहे. या प्रसंगी महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेने २०१८मध्ये आयोजित केलेल्या राज्यस्तरीय कथा व काव्य लेखन स्पर्धेचा बक्षीस समारंभ मान्यवरांच्या हस्ते पार पडला.

**५. काव्य शेकोटी :** महाराष्ट्र साहित्य परिषद कल्याण शाखेतर्फे नुकताच 'काव्य शेकोटी' हा कार्यक्रम साकारण्यात आला.

●





## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा डोंबिवली

**१. दि. ७ डिसेंबर २०१९ :** रोजी मसाप डोंबिवली शाखेने, अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्ष कवयित्री अरुणाताई ढेरे यांचा सत्कार केला. विशेष म्हणजे या कार्यक्रमात डोंबिवलीतील अन्य नऊ संस्थांना सहभागी करून घेण्यात आले होते. त्यामुळे हा कार्यक्रम गावकीचाच झाला. त्यामुळे मसापचे स्थान उंचावले. सूत्रसंचालन कार्यवाह धनश्री साने यांनी केले. आभार वृंदा कौजाल्गीकर यांनी मानले, तर प्रास्ताविक कार्याध्यक्ष सुरेश देशपांडे यांनी केले. डोंबिवलीकर परिवारातर्फे राज्यमंत्री रवींद्र चव्हाण यांनी अरुणाताईंना मानपत्र दिले. या कार्यक्रमास मसापचे प्रमुख कार्यवाह श्री. प्रकाश पायगुडे उपस्थित होते.

कार्यक्रमास साहित्य रसिकांनी प्रचंड गर्दी केली होती.

**२. २७ फेब्रुवारी २०१९ :** हा कवी कुसुमाग्रज यांचा जन्मदिवस, मराठी राजभाषा दिन म्हणून साजरा होतो. मसाप डोंबिवली शाखेने यानिमित्ताने दीपाली केळकर यांचा 'शब्दांच्या गावा जावे' हा कार्यक्रम सादर केला. दीपाली केळकर यांनी शब्दांचे स्वभाव, व्यक्तिमत्त्व, वर्तन यांविषयी खूप छान विवेचन केले.

**३. दि. १७ मार्च २०१९ :** रोजी मसापच्या सदस्य उमा आवटे पुजारी यांच्या 'तू जो मेरे सूरमे' या व्यक्तिचित्रणात्मक पुस्तकाचा प्रकाशन समारंभ आयोजित केला होता. श्री. चंद्रशेखर टिळक यांच्या हस्ते प्रकाशन झाले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा फलटण

महाराष्ट्राचे शिल्पकार स्व. यशवंतराव चव्हाण यांच्या १०६व्या जयंतीनिमित्त येथील कै. नामदेवराव सूर्यवंशी (बेडके) महाविद्यालयात श्रीराम एज्युकेशन सोसायटी, महाराष्ट्र साहित्य परिषद फलटण शाखा, यशवंतराव चव्हाण प्रशाला, सौ. वेणूताई चव्हाण कन्या प्रशाला यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित कार्यक्रमात सचिन सूर्यवंशी- बेडके यांचे व्याख्यान. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सातारा जिल्हा प्रतिनिधी रविंद्र बेडकिहाळ, मसाप फलटण कार्यवाह प्रा.विक्रम आपटे, श्रीराम एज्युकेशन सोसायटीचे उपाध्यक्ष बापूसाहेब मोदी, नियामक मंडळ सदस्य शिवाजीराव बेडके, प्रा. सो. एल. पवार यांची प्रमुख उपस्थिती होती.कार्यक्रमास नामदेवराव सूर्यवंशी- बेडके महाविद्यालयाचे प्राचार्य एल. के. बोराटे, यशवंतराव चव्हाण प्रशालेचे प्राचार्य आर. पी. भोसले, वेणूताई कन्या प्रशालेच्या प्राचार्य सौ. अश्विनी डोईफोडे यांच्यासह मसाप सदस्य, प्राध्यापक, शिक्षक, सेवक उपस्थित होते. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड

**१. शनिवार, दि. ९ फेब्रुवारी २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील १८ वे पुष्प ज्येष्ठ पत्रकार लेखक हेमंत देसाई यांनी गुंफले. याप्रसंगी सभासद श्री. रमेश साळवे यांनी त्यांचे स्वागत केले.

कार्यक्रमास कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, प्रमुख कार्यवाह प्रसाद पवार, कार्यवाह रवींद्र मालुंजकर, नि. जि. न्या. वसंत पाटील कार्यकारिणी सदस्य श्री. दशरथ लोखंडे आदी उपस्थित होते.

**२. शुक्रवार दि. ८ मार्च २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'जागतिक महिला दिन' कार्यक्रमात लेखिका, नाट्यकलावंत प्रा. डॉ. प्रतिभा निलेश जाधव-निकम यांनी 'मी अरुणा बोलतेय' हा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा एकपात्री प्रयोग सादर केला. कार्यकारिणी सदस्या श्रीमती सुजाता हिंगे यांनी त्यांचे स्वागत केले.

**३. शनिवार दि. २३ मार्च २०१९ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील १९वे पुष्प लेखक श्रीराम गायकवाड यांनी गुंफले. या वेळी नि. जि. न्या. व कवी वसंत पाटील यांनी त्यांचा सत्कार केला.

**४. शनिवार, दि. १३ एप्रिल २०१९ :** 'रंग अक्षरांचे' मालिकेतील ४थे पुष्प संपन्न झाले. सहभाग राजेंद्र सोमवंशी, संतोष वाटपाडे आणि रामचंद्र कुलकर्णी यांचा होता. या वेळी सभासद अॅड. मुकुंद भावसार यांनी त्यांचे स्वागत केले.

**५. रविवार दि. २८ एप्रिल २०१९ :** कृष्णा पवार यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड आयोजित 'संवाद सृजनाशी' या मालिकेतील २० वे पुष्प गुंफले. या प्रसंगी उत्तम तेजाळे यांनी त्यांचे स्वागत केले.

**६. बुधवार, दि. १ मे २०१९ ते शुक्रवार दि. १० मे २०१९ :** ठिकाण : शाळा क्र. १२५ चे मैदान, मुक्तीधाम मागे, दत्तमंदिर रोड, नाशिकरोड.

मागील पस्तीस वर्षांपासून नाशिकरोड परिसरात वसंत व्याख्यानमालेचे आयोजन केले जाते. सुरुवातीला भूतपूर्व नाशिकरोड देवळाली नगरपालिका, त्यानंतर नाशिक महानगरपालिका आणि गेल्या वीस वर्षांपासून राज्यातील अग्रणी दि. नाशिकरोड देवळाली व्यापारी सहकारी बँक लि. यांनी यजमानपद स्वीकारले. गेल्या वर्षांपासून महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा नाशिकरोड सहआयोजक म्हणून सक्रिय आहे. विषयांची निवड करणे आणि ते मांडणारे वक्ते सुचविणे ही जबाबदारी शाखेची आहे. रोजच्या व्याख्यानाच्या पुष्पाचे अध्यक्षपद शाखेचे सदस्य भूषवितात.

**सन २०१९च्या वसंत व्याख्यानमालेत खालील वक्त्यांनी आपले विचार मांडले :** (अनुक्रमे दिनांक-वक्ता-व्याख्यानाचा विषय- कार्यक्रमाचे अध्यक्ष)

१) दि. १ मे २०१९ - श्री. किरण भालेराव (नाशिक) - मिने






कलाकाराची मुलाखत- दत्ता गायकवाड, शैलेंद्र तनपुरे, उन्मेष गायधनी; २) दि. २ मे २०१९- डॉ. श्रीपाल सबनीस (पुणे)- सुखी संसाराचे पथ्यपाणी- रावसाहेब पोटे; ३) दि. ३ मे २०१९ - श्रीहरी तापकीर (पुणे)- एव्हरेस्टची यशोगाथा - दशरथ लोखंडे; ४) दि. ४ मे २०१९ - जयप्रकाश प्रधान (पुणे)- बातमी मागची बातमी- कामिनी तनपुरे; ५) दि. ५ मे २०१९- संदीप देशपांडे व इतर (मनमाड)- रंग अक्षरांचे : काव्यमैफल- सुदाम सातभाई; ६) दि. ६ मे २०१९- रागीब अहमद (जळगाव)- नांदा सौख्यभरे- शिवाजी म्हस्के; ७) श्रावण देवरे (नाशिक)- इडा पिडा टळो बळीचे राज्य येवो - सुरेखा गणोरे; ८) दि. ८ मे २०१९ - डॉ. आबा पाटील (नाशिक)- शिवपुत्र संभाजी - सुजाता हिंगे; ९) दि. ९ मे २०१९- महंत चिरडेबाबा (निफाड), श्रीकृष्ण नीती - रेखा पाटील; १०) दि. १० मे २०१९ - राहुल साऊंड अ‍ॅण्ड ट्रॅक्स - राजेश खन्ना हिट्स- नंदन बुब.

प्रत्येक दिवशी आयोजकांतर्फे व्याख्यानमालेस दररोज उपस्थित राहणाऱ्या रसिकांना लकी ड्रॉ काढून विविध बक्षिसे देण्यात आली. कार्यक्रम यशस्वितेसाठी व्यापारी बँक कर्मचारी गणेश मंडळाने सहकार्य केले.

**७. सोमवार दि. २० मे २०१९ :**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे साहित्य चळवळीतील योगदान उल्लेखनीय आहे. ''मराठीला अभिजात भाषेचा दर्जा देण्याची शिफारस करावी ही विनंती करण्यासाठी आपण आलात, तर मला त्यातील महत्त्वाच्या बाबी सांगा.'' अशी विचारणा राज्यपाल महामहिम मा. श्री. विद्यासागरजी रावसाहेब यांनी महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड शिष्टमंडळाकडे केली. मराठी भाषेचा देदीप्यमान इतिहास, अभिजात भाषेची रास्त मागणी, प्रस्तावाचा प्रवास आणि केंद्र शासनाची भूमिका यांबाबत शाखेचे कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी यांनी सविस्तर माहिती दिली. शिष्टमंडळाचे नेतृत्व प्रख्यात लेखक, हिंदुस्तान प्रकाशनचे अध्यक्ष रमेशजी पतंगे यांनी केले. ''मराठी भाषा एक सहज सुंदर भाषा आहे. आपली शाखा या कामी चांगले कार्य करीत आहे.'' असे मा. राज्यपाल म्हणाले. शिष्टमंडळाने 'मेमोरँडम फॉर डिक्लेरिंग मराठी अ‍ॅज क्लासिकल लँग्वेज' निवेदन मा. राज्यपालांना दिले. शिष्टमंडळात कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कार्यवाह रवींद्र मालुंजकर, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई, कार्यकारिणी सदस्य दशरथ लोखंडे, शिवाजी म्हस्के, सल्लागार पांडुरंग चव्हाण, सभासद राहुल बोराडे, जयंत गायधनी, सुशांत उबाळे, पंडित आवारे, शिवाजी बोराडे उपस्थित होते.

**८. शनिवार, दि. २५ मे २०१९ :**

'माध्यमरंग' या अनेक पुरस्कारप्राप्त पुस्तकाचे लेखक, माध्यमतज्ज्ञ रविराज गंधे यांचे व्याख्यान झाले. ●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा पिंपरी चिंचवड

**१. १५ ऑक्टोबर २०१८ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड आयोजित वाचन प्रेरणा दिन १५ ऑक्टोबर २०१८ रोजी साजरा करण्यात आला. मसाप पिंपरी चिंचवडच्या बिजलीनगर येथील कार्यालयात, अध्यक्ष राजन लाखे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या कार्यक्रमात प्रमुख पाहुणे म्हणून प्रा. सुरेखा कटारिया उपस्थित होत्या. विविध पुस्तकातील निवडलेले वेचे, उतारे यांचे प्रभावी अभिवाचन विनीता ऐनापुरे, अपर्णा मोहिले, डॉ. रजनी शेठ, किरण लाखे, विनिता श्रीखंडे, मंगला पाटसकर, माधुरी डिसोजा, बाबू डिसोजा, दीपक अमोलिक, प्रतिभा कुलकर्णी यांनी आपापल्या शैलीत वाचन करून डॉ. अब्दुल कलाम यांना अभिवादन केले. सौ. माधुरी मंगरूळकर यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. सदर कार्यक्रमास पंचेचाळीस सभासद व रसिकांनी आपला सहभाग नोंदविला.

**२) दि. ११ नोव्हेंबर २०१८ :**

रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड आणि मराठी साहित्य व कला मंडळतर्फे प्राधिकरण निगडी सावरकर सदनात 'काव्य रंगे उषःकाल संगे' या दिवाळी काव्यपहाट कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. या कार्यक्रमाचे उद्घाटन मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते झाले. सरस्वती विश्वविद्यालयाचे अध्यक्ष विश्वनाथन के. नायर, रोटरी क्लब चिंचवडचे अध्यक्ष मल्लिनाथ कलशेट्टी, रोटरी क्लब प्राधीकरणाचे सतीश आचार्य, मसापचे पिंपरी चिंचवडचे अध्यक्ष राजन लाखे, डॉ. रजनी शेठ, व्यासपीठावर उपस्थित होते. सदर कार्यक्रमात 'अक्षरवेध' या दिवाळी अंकाचे प्रकाशन मान्यवरांच्या हस्ते झाले. प्रतिभा कुलकर्णी व बी. एस. बनसोडे यांनी घेतलेली साहित्यिक प्रश्नमंजुषा या कार्यक्रमाचे आकर्षण ठरली. त्यामध्ये रसिकांनी भाग घेऊन बक्षिसे पटकावली. सदर कार्यक्रमात एकोणपन्नास कवींनी आपला सहभाग नोंदविला. दिनेश भोसले व प्राची देशपांडे यांनी सूत्रसंचालन केले.

**३) दि. २० डिसेंबर २०१८ :**

रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने पु. लं.च्या जन्मशताब्दी निमित्त 'पु. ल. एक अष्टपैलू व्यक्तिमत्त्व' या विषयावर डॉ. समिता टिल्लू यांचे व्याख्यान आयोजित केले होते. व्यासपीठावर प्रमुख पाहुणे म्हणून महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यवाह शिरीष चिटणीस आणि माधव राजगुरू उपस्थित होते. कार्यक्रमाच्या दुसऱ्या सत्रात पु.लं.च्या साहित्यकृतीच्या अभिवाचनात डॉ. मीना लाड, बी.एस. बनसोडे, मंगला पाटसकर, किरण लाखे यांनी सहभाग घेतला.

**४) दि. ३ जानेवारी २०१९ :**

रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने ग. दि. माडगूळकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'गदिमा यांच्या व्रतस्थ कविता' या विषयावर ज्येष्ठ साहित्यिका डॉ. संजीवनी तोफखाने यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले. सदर कार्यक्रमास प्रमुख पाहुणे म्हणून मसाप पुणेचे कार्यवाह वि. दा. पिंगळे, देहू शाखेचे

अध्यक्ष दत्तात्रय अत्रे उपस्थित होते. सदर कार्यक्रमाचे सूत्रसंचालन कार्यवाह संजय जगताप यांनी केले.

**५) दि. २८ फेब्रुवारी २०१९ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखा आणि प्रतिभा महाविद्यालय चिंचवड यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित मराठी भाषा दिनानिमित्त महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी निबंध स्पर्धेचे आयोजन केले होते. सदर कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे म्हणून प्राचार्य डॉ. अविनाश सांगोलेकर, अ. भा. मराठी साहित्य महामंडळाचे विश्वस्त राजेंद्र मुठाणे होते.

**६) दि. २५ मार्च २०१९ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेने महिला दिनानिमित्त विविध क्षेत्रांतील विशेष उल्लेखनीय महिलांचा सत्कार केला. प्रमुख पाहुणे म्हणून पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या अ प्रभाग अध्यक्षा अनुराधा गोरखे आणि नगरसेविका करुणा चिंचवडे उपस्थित होत्या.

मसापतर्फे निवड झालेल्या विविध क्षेत्रांतील महिलांना पुरस्कार देऊन गौरविण्यात आले. १) सौ. विजया मानमोडे (अहिराणी), २) डॉ. शिल्पागौरी गणपुले (शैक्षणिक), ३) डॉ. श्यामल निर्मळ (वैद्यकीय), ४) डॉ. मावी महाजन (अध्यात्म), ५) डॉ. संगीता दामले (योगविद्या) या महिलांचा पुरस्कारार्थीमध्ये समावेश आहे. 'मी अशी घडले' या विषयावर सौ. पुष्पा नगरकर यांनी त्यांच्या आयुष्यात घडलेल्या घडामोडी तसेच आयुष्याच्या कठीण वळणावर केलेली मात याचे सविस्तर चित्रण रसिकांसमोर उभे केले. सौ. सुनीता नगरकर यांनी भारतातील पहिल्या महिला डॉक्टर 'आनंदीबाई गोपाळ जोशी' यांची व्यक्तिरेखा सादर केली.

●

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दामाजीनगर

**१. २ डिसेंबर २०१८ : पुरस्कार वितरण :**

म.सा.प. दामाजीनगर शाखेच्या वतीने देण्यात येणाऱ्या विविध साहित्य पुरस्कारांचे वितरण महाराष्ट्र साहित्य परिषद पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते व प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांच्या उपस्थितीत करण्यात आले. पुरस्कार विजेते १. मसाजी शिवशरण स्मृती साहित्य पुरस्कार, (कविता) कोषांतर सुप्रिया जाधव. २. कलावती वाकळे स्मृती साहित्य पुरस्कार (कथा), हिरवळ आणि होरपळ- सौ. योजना मोहिते, ३. सिद्धमाला ढगे स्मृती साहित्य पुरस्कार (कादंवरी) काळीजकाटा- सुनिल जवंजाळ, ४. इंदुमती शिर्के स्मृती साहित्य पुरस्कार (कादंबरी) देवलसी संत बहिणाबाई - प्रा. डॉ. श्रुती वडगबाळकर, ५. शहीद राजकुमार ठोंबरे स्मृती पुरस्कार (रसग्रहण) काव्यसरिता सोलापुरी - वंदना कुलकर्णी, ६. काशीजनाई सलगर स्मृती पुरस्कार (समीक्षण) प्रा. डॉ. देवानंद सोनटक्के.

**२. दि. ५ डिसेंबर २०१८ (ई-बुक प्रकाशन)**

१८ ई-पुस्तकांचे प्रकाशन करण्यात आले. प्रकाशित पुस्तके पुढीलप्रमाणे- मुग्धगंध (चारोळी) हरित (ललितलेख), राजेश्वरी कोरे - माहिमकर, दिवस कधी फुलायचे (कविता) लम्हा (हिंदी कविता) मनातील मोरपीस (कथा), सौ. संगीता मासाळ, मीच मला शोधते (कविता), सौ. दया वाकडे, अट्टाहास (कथासंग्रह), सौ. आशा पाटील- ओढ (कविता), सौ. रेश्मा गुंगे, कविता ज्योती सावित्रीच्या (रसग्रहण), व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विद्यार्थी जीवन (प्रा. दत्ता सरगर) जगण्याचे सर्व संदर्भ (कविता), प्रकाश जडे, 'ती'ची क्षितिजे (लेख संग्रह), सौ. रेखा जडे, भाकरी (कविता) हिरालाल तांबोळी, शब्द साज अंतरमनाचा (कविता) सौ. विद्या माने, समर्पण (कविता) गोरक्ष जाधव.

**३. १३ डिसेंबर २०१८ (महमद अझिज स्मृती दिन)**

गायक मोहमद अझिज यांना गाण्यातून श्रद्धांजली - यात दिगंबर भगरे, नवनाथ साळवे, दत्ता वाघ, संतोष ढावरे, रवींद्र लोकरे, नितीन वाभळे यांचा सहभाग.

**४. २४ डिसेंबर २०१८ (महमद रफी स्मृतीदिन) :**

गायक महमद रफी यांना गाण्यातून श्रद्धांजली - सहभाग सुधा मांडवे, नवनाथ सावळे, संतोष ढावरे, भाऊ उन्हाळे, विश्वास खळवट्टे, सागर साळुंखे, दिगंबर भगरे.

**५. २४ जानेवारी २०१९ :**

उनाड मस्ती या मराठी चित्रपटाचे निर्माते दिग्दर्शक सिद्धू कोळी यांनी चित्रपटातील कलावंत चंद्रकांत ढगे, मधुमाला इंगोले, प्रियांका रेणापुरे यांचेसह शाखेस भेट दिली.

**६. २९ जानेवारी २०१९ :**

प्रेमरंग चित्रपटाचे निर्माते कवी - लेखक शरद गोरे यांनी शाखेस भेट देऊन चित्रपटाच्या ट्रेलरचे उद्घाटन शाखाध्यक्ष प्रकाश जडे यांच्या हस्ते केले.

**७. २ फेब्रुवारी २०१९ : हळदी-कुंकवाचा मान पुस्तकाचे वाण:**

मकर संक्रांतीनिमित्त महिला सभासदांनी तिळगुळ समारंभाचे आयोजन करून महिलांना पुस्तकांचे वाण दिले.

**८. ३ फेब्रुवारी २०१९ : प्रकाश शब्द :**

दामाजीनगर शाखेचे अध्यक्ष प्रकाश जडे यांना सोलापूरच्या मनोरमा परिवाराचा आदर्श साहित्य सेवा पुरस्कार सहकारमंत्री ना. सुभाष देशमुख यांच्या हस्ते, पालकमंत्री विजयकुमार देशमुख व मनोरमा परिवाराचे प्रमुख कवी श्रीकांत मोरे यांच्या उपस्थितीत देण्यात आला. प्रकाश जडे यांच्या सन्मानार्थ शाखेने प्रकाशशब्द हा प्रकाश जडे यांच्या निवडक कवितांच्या वाचनाचा कार्यक्रम सादर केला. त्यात प्रा. दत्ता सरगर, सौ. दया वाकडे, सौ. विद्या माने, सौ. मंगला बनसोडे, सौ. संगीता मासाळ, डॉ. राजेश्वरी कोरे, सुषमा सुतार, हेमंत रत्नपारखी व गोरक्ष जाधव यांनी कविता सादर केल्या. या वेळी नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी, र. शि. शहा बँक, मंगळवेढा, चेअरमन राहुल शहा उपस्थित होते.

**९. मराठी राजभाषादिनानिमित्त : २४ ते २७ फेब्रुवारी २०१९ :**

शालेय विद्यार्थ्यांसाठी दि. २५ फेब्रुवारी २०१९ रोजी म्हणी, वाक्प्रचार, हस्ताक्षर व मराठी पोस्टर स्पर्धा; तर २६ फेब्रुवारी २०१९ रोजी कवितावाचन व मराठी भाषा सामान्यज्ञान स्पर्धांचे आयोजन करण्यात आले होते. त्यात तीसहून अधिक विद्यार्थी सहभागी झाले होते. विजेत्यांना रोख रक्कम, स्मृतिचिन्ह- डॉ. शरद शिर्के व डॉ. प्रीती शिर्के यांचे हस्ते देण्यात आले. दि. २४ फेब्रुवारी २०१९ रोजी ग. दि. माडगुळकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने चैत्रबन गाण्याचा कार्यक्रम झाला. त्यात दिगंबर भगरे, मंगेश केकडे, नवनाथ साळवे, नितीन बाभळे, भाऊ उन्हाळे, अनिल गायकवाड, लक्ष्मी माने, डॉ. सुरेश होनमाने, डॉ. शाकीर सय्यद, डॉ. सौ. शबनम सय्यद, डॉ. प्रीती शिर्के, डॉ. किरण पडवळ, डॉ. देवयानी देशमुख यांनी मराठी गीते सादर केली.

**दि. २७ फेब्रुवारी २०१९ :**

हे कसले भाग्य? बोलतो मराठी! या विषयावर प्रा.विश्वनाथ ढेपे यांचे अध्यक्षतेखाली परिसंवाद घेण्यात आला. त्यात सौ. अवंती पटवर्धन, प्रा. पठाण, शिवशरण, सौ. हेमलता नकाते, प्रा. महेश अलिगावे, दया वाकडे, बालाजी शिंदे, रेश्मा गुंगे यांनी सहभाग घेतला.

**शाखा भेटी :**

या अहवालकाळात शाखेस कवी नारायण सुमंत, चित्रपट कलातंत्रज्ञ - नागेश जरग, अभिनेते सुदर्शन कोळी, अभिनेत्री अश्विनी नवगिरे, माजी मंत्री प्रा. लक्ष्मण ढोबळे, अभिनेत्री राजेश्वरी खरात, अ. भा. साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख, विनोदी लेखक बंडा जोशी, म.सा.प. पुणेचे प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी, म.सा.पं. पुणे विभागीय सचिव शिंदे-कल्याण, संत साहित्याचे अभ्यासक प्रा. विद्यासागर पाटंगणकर, साहित्यिक व वक्ते प्रा. गणेश शिंदे, कथालेखक अविनाश हळवे, विनोदी अभिनेते विजय कदम, सुनील गोडबोले, कवी हेमंत मुशरफ आदींनी भेट दिली.

**११. दि. ८ मार्च २०१९ :**

जागतिक महिला दिनानिमित्त परिसंवाद, सौ. अर्चना सलगर यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या या परिसंवादात डॉ. राजेश्वरी कोरे, सौ. हेमलता नकाते, सौ. दया वाकडे, सौ. सुषमा सुतार, सौ. संगीता मासाळ, सौ.रेश्मा गुंगे, सौ. कविता अलिगावे या सहभागी झाल्या. परिसंवादाचे उद्घाटन करताना डॉ. किरण पडवळ यांनी प्रगतीच्या आड येणारी रीत हलकेच दूर सारली पाहिजे, असे प्रतिपादन केले.

**१२. दि. २२ मार्च २०१९ :**

जागतिक कविता दिनानिमित्त प्रकाश जडे यांच्या अध्यक्षतेखाली कवी संमेलनाचे आयोजन करण्यात आले. या संमेलनात सौ. विद्या माने, गोरक्ष जाधव, रेश्मा गुंगे, दया वाकडे, सुषमा सुतार यांनी कविता सादर केल्या. सूत्रसंचालन बालाजी शिंदे यांनी केले. अशपाक काझी यांनी आभार मानले.

**१३. दि. १० एप्रिल २०१९ :**

महात्मा फुले जयंतीनिमित्ताने महिलांसाठी सामान्यज्ञान स्पर्धा व समुपदेशन सत्राचे आयोजन करण्यात आले. स्पर्धेतील विजेत्या मंगल बनसोडे, भारती धनवे, सुधा मांडवे, रूपाली शिंगाडे, सखुबाई माळी यांना स्मृतिचिन्ह व प्रमाणपत्र देऊन गौरविण्यात आले. अध्यक्षस्थानी डॉ. शबनम सय्यद होत्या. मंगळवेढा पोलिस स्टेशनच्या महिला समुपदेशिका सौ. विभावनी कसबे व कु. ज्योती अभंगराव यांनी महिलांना मार्गदर्शन केले.

**१४. दि. ९ मे २०१९ :**

सोलापूरच्या ज्येष्ठ नाट्यकर्मी अनुजा मोडक यांनी शाखेस भेट दिली. तेव्हा सुषमा सुतार व भारती धनवे यांनी त्यांची प्रकट मुलाखत घेतली. ●

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा येरवडा-विश्रांतवाडी

**येरवड्यात रंगली काव्य मैफल :**

महाराष्ट्र साहित्य परिषद (येरवडा / विश्रांतवाडी शाखा व शिवराज मित्र मंडळातर्फे महाराष्ट्र हौसिंग बोर्ड, पुणे येथे आयोजित कवी संमेलनात सामाजिक, राजकीय, प्रेम, विनोदी अशा अनेक विषयांवर कवींनी कविता सादर करून काव्य मैफलीत रंगत आणली. म.सा.प. येरवडा / विश्रांतवाडी शाखेच्या अध्यक्ष प्रा. रूपाली अवचरे यांनी सूत्रसंचालनाची जबाबदारी समर्थपणे बजावून काव्यमैफल रंगवली.

ज्येष्ठ साहित्यिक बाळकृष्ण बाचल यांच्या अध्यक्षतेखाली काव्य मैफल उत्साही वातावरणात संपन्न झाली. याप्रसंगी प्रमुख पाहुणे प्रा. नीलिमा बाकरे, डॉ. वृपाली रणधीर यांनी आपले मनोगत व्यक्त केले.

वर्षा सडकर, अलका जोशी, ज्योती लाड, विनोद अष्टुळ, सुरेश पाटोळे, सीताराम नरके, सुरेश घोत्रे, आनंद गायकवाड सर्व कवींनी कविता सादर करून रसिकांची दाद मिळवली. कोषाध्यक्ष रमेश जाधव, प्रशांत खंडाळे, विजय कांबळे यांनी आयोजन केले.

**कवी संमेलन :**

महाराष्ट्र साहित्य परिषद येरवडा विश्रांतवाडी शाखेतर्फे ज्येष्ठ नागरिकांसाठी महाराष्ट्र हाऊसिंग बोर्ड येरवडा येथे ज्येष्ठ नागरिक संघ विरंगुळा केंद्रात कवी संमेलन आयोजित केले होते. कवी संमेलनास प्रमुख पाहुणे पुण्याचे उपमहापौर डॉ. सिद्धार्थ धेंडे उपस्थित होते. संमेलनाच्या अध्यक्षस्थानी ज्येष्ठ नागरिक संघाचे पदाधिकारी ज्ञानोबा कसाब होते.

●








महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने कै. पुष्पा पुसाळकर पुरस्कार 'ऐवजी' या नंदा खरे लिखित ग्रंथाच्या उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीबद्दल हा पुरस्कार मनोविकास प्रकाशनाचे आशिष पाटकर यांना डॉ. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते देण्यात आला.



महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने डॉ. शकुंतला क्षीरसागर पुरस्कृत कै. विलास शंकर रानडे पुरस्कार कॉन्टिनेन्टल प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या डॉ. यशवंत तोरो यांच्या 'कॅन्सर-निदान, उपचार व प्रतिबंध' या पुस्तकाला डॉ. अभिजित वैद्य यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला.







मसापच्या 'एक कवी, एक कवयित्री' या कार्यक्रमात डॉ. वीरा राठोड आणि कल्पना दुधाळ यांची मुलाखत उद्धव कानडे आणि प्रमोद आडकर यांनी घेतली.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे आयोजित 'मसाप गप्पा' या उपक्रमात साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांनी अ.भा. साहित्य महामंडळाचे अध्यक्ष कौतिकराव ठाले-पाटील यांच्याशी संवाद साधला.



छात्र प्रबोधन मासिकातर्फे कुमारांसाठी आयोजित राज्यस्तरीय निवासी लेखन संपादन कार्यशाळेतील सहभागी कुमार लेखकांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेला भेट दिली. डॉ. अरुणा ढेरे यांनी मार्गदर्शन केले.

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : June 2019
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category.    Publishing Date : 30 June 2019

# महाराष्ट्र साहित्य परिषद पुस्तक सूची

**२५टक्के सवलतीत!**

## सूची

- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ : रु. ५००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग१) : रु. ७००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ (भाग२) : रु. ७००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ३ : रु. ३५०/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ४ : रु. ४००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग १) : रु. ३५०/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ५ (भाग २) : रु. ३५०/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग १) : रु. ३५०/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ६ (भाग २) : रु. ३००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग १) : रु. ७००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग २) : रु. ८००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ३) : रु. ७००/-
- मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड ७ (भाग ४) : रु. ७००/-
- भारतीय भाषांतील स्त्रीवादी साहित्य : रु. ८००/-
- भाषा व साहित्य संशोधन खंड १ : रु. ५००/-
- भाषा व साहित्य संशोधन खंड २ : रु. ३००/-
- भाषा व साहित्य संशोधन खंड ३ : रु. २००/-
- म.सा.पत्रिका लेख-सूची : रु. ४००/-

डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस. टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मराठी वाङ्मयाचा इतिहास
खंड सातवा : १९५० ते २०००
भाग तिसरा

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२[illegible]/६४



बुक-पोस्ट

सु.प पवार-खंडागळे सुवर्णा गोरख
२४८. 'अनंत प्रसाद',
आपले घर हौ.सोसा.,
खराडी, पुणे - ४११०१४




प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३